# ' करप्शन ' विषयी थोडेसे

**-- चं.प्र.देशपांडे.**

कुणी म्हणतं की, माणसं कितीही करप्ट होत असली, चारित्र्यहीन होत असली, कुजकी होत असली आणि डावपेची होत असली तरी जग टिकून आहे ते विश्वास, प्रेम आणि त्याग हेही अजून टिकून आहेत म्हणूनच. आणि या महान आणि पायाभूत गोष्टींना जर मानवजात विसरली तर सर्वनाश अटळ आहे.

उदाहरणार्थ, पैसा ही गोष्ट घ्या. ज्यानं-त्यानं आपापल्या कष्टानं आणि कष्टाच्या प्रमाणात कमवावं आणि एकमेकांच्या सुखदुःखांची जाणीव ठेवून ठाकठीक जगावं. ही एक साधी सोज्वळ अपेक्षा. पण असं होत नाही. आपलं आपण शक्य तो कमवून घ्यायला हवं -- आपल्या बारीकसारीक गरजांपासून ते सुखांपर्यंतची शक्य तेवढी जास्तीतजास्त तजवीज आपली आपणच करायला हवी. कुणाचा कुणी भरवसा धरावा ? अशा विचारांनी माणसं स्वतःच बेभरवशाची होतात, स्वतःच्या जाणिवा बोथट करून घेतात, सरळ मोकळेपणानं जगणं झुगारून एक ऐदी बेफिकिरी पत्करतात आणि आपले प्रश्न हे फक्त आपलेच प्रश्न आहेत, इतरांचा त्यांच्याशी काही संबंध नाही, अशा स्वरूपाच्या एका कोंदट सारांशात आयुष्य बसवून टाकायला तयार होतात. फार तर, कुणी हे प्रवाहपतित होऊन स्वीकारत असतील आणि कुणी जाणीवपूर्वक. हा झाला करप्शनचा ढाचा.

यातून, अर्थातच, एकमेकांच्या जाचांची मालिका सुरू होते. माझ्या वागण्यातून मी दुसऱ्या एखाद्यासाठी एखादा कठीण, दुःखदायक प्रश्न तर निर्माण करत नाही आहे ना याची जाण परागंदा झाली म्हणजे अर्थातच समोरच्या माणसाला माणूस म्हणून विशेष अर्थच कसा राहणार ? विशेष अर्थ म्हणजे तरी काय ? तर आपल्याला जो आहे ( असे आपल्याला 'वाटत' असेल कदाचित) तोच. आणि त्या समोरच्या माणसाला तरी काय तुम्ही म्हणजे फक्त एक समोरचा माणूसच. सगळीच माणसं एकमेकांकडे असं 'समोरचा माणूस ' म्हणून पाहू लागली तर अर्थातच एक क्षण असा येणार की प्रत्येकाला एका भयाण एकाकीपणाला तोंड द्यावं लागणार. आणि हा एकाकीपणा ही शेवटची पायरी. इथून आणखी कुठं चढण्याचा वा उतरण्याचा प्रश्नच नसतो.

यातूनही थोडी तोड म्हणून दुतोंडीपणाचा खेळ सुरू होतो. म्हणजे ही एक समांतर प्रक्रिया राहाते. सगळ्यांनाच ' समोरचा माणूस ' म्हणून पाहण्याऐवजी काही व्यक्ती ' खास आपल्या ' म्हणून पाहिल्या जातात. त्यांच्या सुख-दुःखांची काळजी घेतली जाते. त्यांच्यावर विश्वास टाकण्याचा प्रयत्न सातत्याने चालू राहातो. त्यांच्यासाठी कोणत्या-ना-कोणत्या कारणानं झटण्यात धन्यता वाटत राहाते. याचे परिणाम वा दुष्परिणाम जे असायचे ते असतातच, पण त्या माणसाच्या दृष्टीनं हा काहीसातरी विसावा असतो. कारण संशयातले ताण विश्वासातच थोडे मोकळे होतात. पण तरीही ठोकताळेवजा सारांश काढायचा झाला तर, माणूस जितका अधिकाधिक करप्ट आणि जितका इतरांच्या जीवनाविषयी दगडीपणानं बेफिकीर तितक्या तितक्या प्रमाणात तो स्वतःच्या आयुष्याचा गुंता वाढवतो आणि एक प्रकारे स्वतःचा चुथडा करून घेतो. एखाद्या दैवी न्यायाप्रमाणे इतरांना दिलेल्या दुःखांचे हिशोब त्याला इथल्या इथेच चुकवावे लागतात. आणि यात कोणतीही हुशारी कामाची नसते.

पण हे जरी खरं असलं तरी एखाद्या करप्ट माणसाचा ज्याला त्रास होतो त्याचं काय ? -- हा प्रश्न राहातोच. यातही पुन्हा त्रास कुणाला होतो ? तुल्यबळ माणसं आपापले तोल सांभाळत, एकमेकांकडे पाहून स्मित करून पुढे जातात -- त्यांची दडपणं खरी भोगावी लागतात ती 'कमकुवत' माणसांना -- म्हणजे करप्शन हा ज्यांच्या आयुष्याचा पाया झालेला नाही अशांना. कारण करप्ट माणसं पॉवरपॉलिटिक्सच्या तत्त्वाप्रमाणे थोडेफार संघर्ष करून अथवा संघर्ष टाळून सुरक्षित राहातात. अडचण होते ती कमकुवत माणसाची. ज्याची स्वतःची करप्ट व्हायची मानसिक तयारी आहे पण संधीच्या अभावी जो ' मागे पडलेला ' आहे, तो मनातल्या मनात दुसऱ्यांच्या आपल्यावरील आक्रमणांचीही समर्थनं स्वीकारतो आणि फक्त स्वतःला अजून संधी नाही म्हणून दुःखी राहातो. राहातात ज्यांना करप्ट व्हायचंच नाही अशी माणसं -- ज्यांची फक्त एक साधं,सरळ, निनावी आयुष्य जगायची तयारी असते आणि ज्यांची एकमेकांबद्दलची आस्था बरीचशी टिकून असते.

अशा प्रकारच्या माणसाची अवस्था भयानक होते. डावपेचांच्या जंजाळाचे ताण विनाकारणच त्याला विध्द करत राहतात. आणि त्याला असा प्रश्न पडतो की, मी सरळ वागणारा असूनही माझ्या वाटेला हे सगळं दुःख का ? माझा काहीच अपराध नसताना ही माणसं जिथं तिथं माझा छळ का करतात ? आणि एका असहाय संतापाचा धनी होऊन जळत राहाणं हेच एक त्याचं अटळ भवितव्य होऊन बसतं.

यातून बऱ्यापैकी होऊ शकणारी एकच गोष्ट म्हणजे कमकुवत माणसांनी एकत्रं येणं, बंड करणं आणि आपल्या एकत्रित शक्तीनं ( ही माणसं सुदैवानं संख्येनं नेहमीच खूपच जास्त असतात ) अत्याचारी, करप्ट, शक्तींचा डोलारा

उलथून टाकणं, जिथं जिथं अशा शक्ती डोकी वर काढायचा प्रयत्न करतील तिथं तिथं ती डोकी उडवणं आणि त्यांचा नायनाट करून टाकणं.

पण यातून तरी प्रश्न मिटतात का ? की प्रश्नांची स्वरूपं फक्त बदलतात ? हे पुन्हा पाहाण्यासारखं आहे. या नव्या वातावरणात सत्तेचे डावपेच सुरू होतात. पैसा, संपत्ती यांच्या बाबतीत जी माणसं करप्ट नव्हती ती इथं करप्ट होतात. जणू त्यांना त्यांचं क्षेत्र सापडतं. वैचारिक, भावनिक, नैतिक, इत्यादी क्षेत्रांतले जाच-दडपणांचे खेळ आता अधिक प्रमाणात सुरू होतात. म्हणजे याचा अर्थ असा की फक्त स्वरूपं बदलून पुन्हा तीच गोष्ट चालू राहाते. म्हणजे करप्शनची बीजं सगळ्यांमध्येच असतात--फक्त मार्ग आणि क्षेत्रं वेगवेगळी असतात इतकंच. मग असं समजायचं का, की एकमेकांचा जाच करत राहाणे हाच मानवी आयुष्याचा पाया आहे ? या दुष्ट तत्त्वाचे मूळ तरी कशात आहे ? निरनिराळ्या ताणांचे निर्माते, भोक्ते आणि परिपाक म्हणून केवळ जगावं लागणं ही मानवी आयुष्याची एक शोकात्मिकाच नाही का ? का ही एक अटळ गोष्ट असल्यानं हिला शोकात्मिकाही म्हणू नये ?

म्हणजे करप्शन हा काही केवळ आर्थिक, वैचारिक, भावनिक अथवा तथाकथित धार्मिक क्षेत्राचाच फक्त प्रश्न नसावा. या प्रश्नाचं मूळ आपल्यातच कुठंतरी असावं आणि त्याच्या विषवल्ली निरनिराळ्या प्रकारे पसरत असाव्यात. एक माणूस दुसऱ्या माणसाला नाईलाजाच्या परिस्थितीत का पकडतो ? याचं उत्तर थोडंसं मूर्ख भाषेत द्यावं लागेलसं वाटतं. ते म्हणजे असं की, ती दोन वेगवेगळी माणसं असतात म्हणून ! आणि वर-वर पाहाता हे उत्तर मूर्खपणाचं वाटलं तरी याचाही गंभीरपणे विचार व्हायला हवा हे लगेच आपल्या लक्षात येतंच. कारण एक गोष्ट आपल्याला आता निश्चितपणे जाणवायला लागतेच की, या प्रश्नाची सोडवणूक आर्थिक, राजकीय, किंवा वैचारिक, धार्मिक अशा कोणत्याही एका बाह्य स्तरावर होऊच शकणार नाही. तशी ती करण्याचा प्रयत्न करणं म्हणजे दगडावर डोकं आपटण्यासारखं आहे. म्हणून मग असं वाटतं की, खरं आहे, दोन वेगवेगळी माणसं म्हणजे तरी काय ? याचाही विचार व्हावा.

तर माणसं वेगवेगळी असतात म्हणजे काय ? त्यांची शरीरं वेगवेगळी असतात, आणि व्यक्तित्वं वेगवेगळी असतात. व्यक्तित्व म्हणजे निरनिराळ्या संस्कारांनी, माहित्यांनी, परिस्थितींनी, आठवणींनी आणि स्वभावांनी युक्त असलेलं अस्तित्व. आणि या गोष्टींचं एक ठाम वेगळेपण असं महत्त्वपूर्ण वेगळेपणानं जाणवणं ही व्यक्तित्वाला पटू शकणारी - दिलासा देणारी - अशी आपल्या अस्तित्वाची निशाणी. आणि ही निशाणी म्हणजे दुसरं-तिसरं काही नसून एकाकीपणा असतो. कारण स्वतःच्या अस्तित्वाची कल्पना या ठाम, निश्चित आणि प्रस्थापित गोष्टींपुरती मर्यादित असणं म्हणजेच स्वतःचा एक तुकडा वेगळा मानणं -- वेगळा असतोच -- पण वेगळेपणातच अस्तित्वाचा शेवट मानणं म्हणजे एकाकीपणा स्वीकारणं होय. म्हणजेच आपण असतो याचा अर्थच असा की, आपण एकाकी असतो. आणि दोन एकाकी माणसं एकत्र आली, मित्र झाली म्हणून काही एकाकीपणा नाहीसा होत नाही. एकमेकांचे ताण कायमच राहातात.

म्हणजे मघाशी जो आपल्याला शोध लागला होता की, करप्शनमधून शेवटी एकाकीपणाची अशी एक असह्य जाणीव होणं हे अटळ आहे -- याचा अर्थ असा नव्हे की, आधी करप्शन आणि मग एकाकीपणा. उलट आधी आपण एकाकी असतो म्हणून आपण करप्ट होतो. किंबहुना, एकाकी असणं म्हणजेच करप्ट असणं. आणि एकाकीपणातून उद्भवणाऱ्या सगळ्या क्रिया आणि निर्णय हे अपरिहार्यपणे त्या एकाकीपणाला बळकटीच आणतात.

म्हणजे खरा प्रश्न करप्शन नाहीसं होऊ शकेल का हा नसून एकाकीपणा नाहीसा होऊ शकेल का -- हा आहे. आणि हा प्रश्न स्वतःला विचारायला मनाची एक किमान तयारी पाहिजे. कारण एकाकीपणाच्या प्रश्नाला सामाजिक सोडवणूक सापडणार नाही. प्रत्येक व्यक्तीचा एकाकीपणाचा प्रश्न त्या - त्या व्यक्तीतच सुटू शकेल. आणि हा प्रश्न स्वतःला विचारायचा तर आजपर्यंत जपलेल्या व्यक्तित्वाच्या कल्पनेला सुरुंग लागण्याचा धोका असणारच. किंबहुना, खात्रीच. कारण एकाकी माणसाची जरी अशी इच्छा असली की, आपला एकाकीपणा राहावाही आणि त्यापासून आपली सुटकाही व्हावी -- तर हे दोन्ही घडणं अशक्य आहे. यात दोन्हींपैकी कोणतीतरी एकच अवस्था अस्तित्वात असू शकेल.

म्हणजे पैसा, संपत्ती या स्तरावरच्या करप्शनचा विचार करता-करता (मधेच एखाद्या मार्गाच्या मोहातही पडून ) आपण या अशा बिनतोड ठिकाणी येऊन पोचतो. आणि आपल्याला ' बाप दाखव, नाही तर श्राध्द कर ' ही म्हण आठवते. करप्शनच्या नावानं बोंब मारणाऱ्या माणसा, तूही करप्ट आहेस, बोल ! स्वतःतली करप्शन नष्ट करायला आहेस तयार ? आणि इथं आपण गप्प बसतो. कारण इथं आपली 'हो' म्हणायचीही तयारी नसते आणि 'नाही' म्हणायचीही नसते.

जन्माला येतांना आपलं असं एक काही ठाम अस्तित्व आपल्याला ठरवून मिळालेलं असतं का ? किंवा अस्तित्वाचा अमुक इतका एक भाग मिळालेला आहे आणि त्याच्या वाढण्याच्या या एवढ्या एवढ्या मर्यादा असं काही ? की अमुक एक प्रकारेच हे वाढेल ? समजा की, अस्तित्वाचा निश्चित असा एक भाग जन्मताना मिळतो. पुढे ? पुढं प्रत्येक क्षणी -- असंख्य क्षणी, असंख्य परिणामांच्या असंख्य शक्यतांमधून ते अस्तित्व त्याचा आकार घेत जातं -- स्वभाव जमवत जातं -- आठवणी,माहिती, अनुभव, इत्यादींनी वाढत जातं. म्हणजे आपल्या अस्तित्वाच्या ठामपणाच्या आणि

निश्चितपणाच्या कल्पनेतले हे सगळे नंतरचे भाग असे उपरे असतात. एका अर्थानं ते आपलं अस्तित्व नसतंच. ते फक्त असंख्य क्षणांच्या परिणामस्वरूप ताणांचं बांडगूळ अस्तित्व असतं. आणि याच विचाराप्रमाणे आपण मघाशी जे जन्मतांना मिळणारं असं एक निश्चित अस्तित्व गृहीत धरलं तेही उपरंच ठरणार. म्हणजे आपण ज्याला स्वतंत्र व्यक्तिमत्व म्हणतो ते वस्तुतः असतं परतंत्र बांडगूळ. खरोखरच्या अस्तित्वाशी अर्थाअर्थी काहीच संबंध नसलेली गोष्ट.

मग ' खरोखरचं अस्तित्व ' म्हणजे तरी काय असेल ? की सगळीच एकूणच बंडलबाजी आहे ? एखादी अवाढव्य अफरातफरच नुसती ?

केवळ ताण अस्तित्वात असू शकतात का ? की मुक्त गतीच्या विकृतीतून ताण निर्माण होतात ?

आपण ज्या उपऱ्या गोष्टी पाहिल्या त्यांचं केवळ अस्तित्व गृहीत धरल्यामुळे तर आपण ताणांच्या एकाकीपणाचे भक्ष्य बनत नाही ना ?आपल्या अस्तित्वाच्या मुक्त गतीची स्वाभाविक अवस्था काय असते ? आणि तशी काही असते का ?

शोधण्यापूर्वीच ' तसं काही नसतंच ' असं म्हणून, डोळे मिटून, एखादा चिलिमीचा झुरका मारता येईल.

पण याचा अर्थ मात्र असा होईल की, ' करप्शन' हा मानवाला मिळालेला एक अटळ शाप असून ' करप्शन ' ला 'करप्शन' म्हणायचीही जरूर नाही. तीच त्याची स्वाभाविक 'खरी ' अवस्था आहे.

मग मात्र कोणताही विचार न करता या अंदाजे ' खरे ' पणात आपल्याला जगत राहाता येईल. मरेपर्यंत करप्ट राहून.

( अभिरुचि, जाने-फेब्रु.१९७३ )

*****

दैनिक 'विशाल सह्याद्रि' मधील

**उडत्या तबकडया**

या सदराची सुरूवात २१ जुलै १९६८.

**-- चं.प्र.देशपांडे.**

# असा एक रस्ता

आज एका जागतिक महत्त्वाच्या रस्त्याबद्दल लिहिणार आहे. हा एक अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण रस्ता आहे. ही वैशिष्ट्ये काही हेतुतः निर्माण केलेली नाहीत. हा सबंध जगातला एकमेवाव्दितीय रस्ता आहे असं म्हणायला काहीही हरकत नाही.

आता तुम्ही म्हणाल की, मग तसे सगळेच रस्ते एकमेवाव्दितीय असतात. प्रत्येक रस्ता आपापल्या परीनं स्वतंत्र असतो. त्याला आपली स्वतःची अशी वळणं-वाकणं असतात. कंगोरे असतात. आणि स्वतःचं असं एक व्यक्तिमत्व असतं. कबूल ! पण मी ज्या रस्त्याबद्दल लिहितो आहे त्याचं अव्दितीयत्व इतकं ढोबळ स्वरूपाचं नाही. हा एक अत्यंत समृध्द असा रस्ता आहे.

या रस्त्यावर काय नाही म्हणून विचारा. सर्व काही आहे. प्राथमिक शाळेपासून ते पदवीपर्यंतचं शिक्षण इथं पूर्ण होऊ शकेल. या रस्त्यावर कोणत्याही व्यक्तीच्या संपूर्ण विकासाला वाव आहे. व्यायामशाळा, पोहण्याचे वर्ग इथपासून ते चित्र-शिल्प विद्यालय वा संगीत, नृत्याचे वर्ग इथपर्यंत या रस्त्यावर सगळं आहे. खेळायचं असेल तर प्रचंड मैदान आहे. नाटक पाहायची सोय आहे. सिनेमा थिएटर आहे. व्याख्यानं ऐकायची असतील तर तेहि या रस्त्याबाहेर न जाता करता येईल. साहित्य संस्था आहे. भाविकांसाठी देवळं आहेत. त्यामुळं कीर्तनं आहेत. बरीवाईट सर्व तऱ्हेची उपाहारगृहे आहेत. रेशन, भाजीपाला, कापड इथपासून ते स्कूटर पर्यंत वस्तू विकणारी दुकानं आहेत. प्रकाशन संस्था आहेत. वकील आहेत, डॉक्टर्स आहेत. प्रत्येक राजकीय पक्षाची एक तरी महत्त्वाची व्यक्ती या रस्त्यावर राहते, वा राहिलेली आहे असं कळत. सगळं आहे. ( काही राहिलं असल्यास चूकभूल माफ असावी.)

लोकहो, वर देवळं-कीर्तनं हे शब्द येऊन गेले. तेव्हा तुम्ही हा रस्ता कदाचित ओळखलेला असेलच. होय -- पुण्यातला सुप्रसिध्द ( आणि अपघातांसाठी कुप्रसिध्दही ) रस्ता ' टिळक रोड. ' या रस्त्याची ही समृध्दता कदाचित तुमच्यापैकी बऱ्याच जणांच्या लक्षात आलीही असेल. आली नसल्यास आता ही गोष्ट लक्षात घ्या आणि आंतरराष्ट्रीय वर्षानिमित्त तसंच पुढं केव्हाही जे जे परदेशी पाहुणे येतील ( अर्थात आपले देशबंधू पर्यटकही ) त्यांच्या ही गोष्ट निदर्शनास आणून द्या. हा टिळक रोड जगप्रसिध्द व्हायच्या लायकीचा आहे.

या रस्त्याशी संबंधित आणखी एक गोष्ट सांगायची राहिलेली आहे. अभिनव कलामंदिराजवळ तुम्ही आलात की निसर्गसौंदर्याचा एक चमत्कार तुम्हाला पाह्यला मिळेल, तोही कलामंदिराजवळच. हा एक ग्रेट योगायोग. प्रचंड आकाशाच्या पार्श्वभूमीवर एक जुनाट उंचा पुरा वड आपलं गांभीर्य तोलत उभा असलेला तुम्हाला दिसेल. त्याच्या पारंब्या थेट खालपर्यंत येऊन जमिनीत शिरलेल्या दिसतील आणि खालचे पडके अवशेष त्या गांभीर्यावर कालाची सावली टाकताना दिसतील. शहराच्या गजबजलेल्या भागात हे प्रचंड दर्शन. लोक हो, पुण्यातलं हे एक अत्यंत महत्त्वाचं असं प्रेक्षणीय स्थळ नव्हे काय ?

( २१ जुलै ६८ )

*****

## एक माफक अपघात

रात्री सुमारे नऊ-साडेनऊची वेळ. स्वारगेटहून आठ नंबरची बस गच्च भरून, सहकारनगरच्या दिशेने सुटली. सातारा रोड. आता विश्वास ठेवा किंवा ठेवू नका. मनात विचार आला जर समोरून काही वाहन येऊन या बसवर आदळलं तर मागच्या लोकांना दिसणार नाही. ड्रायव्हरवर हवाला ठेवून आपले चाललेत आणि योगायोग ( अपघात आणि योगायोग हे होन्हीही इंग्रजीत ॲक्सिडेंटच ) असा की या बसला खरोखरीच अपघात झाला !

आता अपघात म्हटलं की अवयवांचे तुकडे , रक्तामांसाचा चिखल, मोडतोड होऊन उद्ध्वस्त स्थितीतली वाहनं इत्यादी इत्यादी विचार येतात.पण... तसं कशाला, काय झालं ते नीट स्टेप बाय स्टेप सांगतो. ही जी काय बस सुटली ती बिबवेवाडी कार्नरच्या पुढेपर्यंत अजिबात अपघात न करता आली. पुढच्या पुलाआधीचे वळणावर मात्र ती तशी राहिली नाही. झालं काय की समोरून एक एस.टी.आली. त्यांचं एकमेकांना क्रॉस करण्याचं ठिकाण योगायोगानं त्या वळणावर आलं. सरळ दोन्ही गाड्या आपल्या एकमेकींच्या नाकाचा नेम धरून पुढे येतायत. पण ड्रायव्हर आपले त्यांतल्या त्यात बरे, नाके वळवून दोघांनीही आपला वेग कमी केला. पण तरीही त्या गाड्या इतक्या जवळ जवळ क्रॉस होत होत्या की ...एकदम खड खड खड खड आवाज यायला लागला. हा आवाज कसला काय बघेपर्यंत आवाज थांबलाही. दोन्ही गाड्या आपापल्या पार्श्वभागांची कड एकमेकांना लावून उभ्या ! बस्स, एवढंच.

आता हे तसं विशेष काही नव्हतं. खिडक्यांजवळचे लोक उठले होते आणि आपले उजवे हात बाहेर नव्हते म्हणून त्यांना कुरवाळत होते. वाटलं आता हे सावकाश गाडी पुढे काढतील. तर दोन-चार माणसं आपली उठली आणि चला चालत, आता काय सुटणार ही गाडी, पंचनामा न् अमुक न् तमुक -- असं म्हणत उतरून तडक चालायला लागली. ते बहुतेक अपघातातले अनुभवी असावेत. रोज आपले दोन चार अपघात खिशात. आदर वाटला. मग हळूहळू सगळीच माणसं उतरली. काहींनी कुठल्या गाडीचं कितपत नुकसान झालंय त्याची काळजीपूर्वक तपासणी करून मग काही विशेष नाही असं म्हणून अपघाताचा निरोप घेतला. बसच्या बाहेरच्या पत्र्याच्या पट्टया उचकटल्या होत्या आणि एक दोन छोटे खड्डे पडलेले होते, बाकी काही नाही. अरे एस्.टी.चा ड्रायव्हर कुठाय, पंचनामा करायचा का काय म्हणतोय -- बसचा ड्रायव्हर विचारतोय, इकडे सातारा रोडवरची वाहतूक बंद. सहकारनगरला वळसा घालून तिकडून चालू ! हळूहळू सगळे लोक गेले. एस.टी.तलेही लोक आपण सिटी बसनं जाऊ म्हणत सामान काढू लागले. वगैरे. मीही मग निघालो. पंचनाम्यावाल्यांना कुठली माणसं मिळाली असतील कोण जाणे !

तुम्ही म्हणाल, काय एवढ्याशा पिटुकल्या अपघाताचं वर्णन करताय राव ! तर ते का तेच सांगतोय आता. हा अपघात झाल्यावर भीती वाटणं, ड्रायव्हरांना शिव्या देणं वगैरे प्रकार व्हायला हवेत की नाही ? हे काहीच झालं नाही. एकेक कंपू आपला मजेत चर्चा करत चाललाय ! प्रत्येकाच्या मनात कुठेतरी असा विचार असणारच की सरळ धडक झाली असती तर किंवा आपला हात बाहेर असता तर ?

काहीही, कशाचाही अतिरेक झाला म्हणजे त्याची विकृतीत परिणती होते. परदेशातलं असं एक वृत्त वाचल्याचं मला आठवतं ( ती बातमी होती की गोष्ट हे आता निश्चितपणे आठवत नाही -- काहीही असलं तरी इथं फारसा बाध येणार नाही.) एका माणसानं केवळ या अनुभवाखातर काही अपघात हेतुपुरस्सर घडवून आणल्याबद्दलचा तो मजकूर होता. माजलेला रेडा आणि माणूस यांची झुज पाहणं, मृत्यू गोलातले खेळ पाहणं हे सगळे असेच प्रकार आहेत.

म्हणजे मग असे माफक निरुपद्रवी अपघात अनुभवायला माणूस उत्सुक असतो असं म्हणायचं काय ? याचं उत्तर नाही असंच द्यावं लागेल कारण कुठल्याही अपघातात नाशाची शक्यता जर गृहीत नसेल तर ते काही खरं नव्हे आणि अशा शक्यता टाळणं हा तर स्वाभाविकपणा आहे.

योगायोगानं कुणाला तरी हा अनुभव मिळून जातो एवढंच !

(२८ जुलै १९६८)

*****

# सुसा

साहित्य परिषदेचा हॉल. हो तोच, अमुक एका कादंबरीवर चर्चा करायची असं ठरवून काही माणसं बसतात. आणि ती कादंबरी बाजूला ठेवून कुठल्यातरी वादावर ( म्हणजे अस्तित्ववादावर वगैरे ) चर्चा करत बसतात ते इथंच. बाहेरच्या रहदारीचा मिश्र आवाज आणि आतल्या वैचारिक रहदारीचा आवाज यांच्यातला फरक जिथं थोड्याच वेळात कळेनसा होतो तोच हा हॉल.

तर या हॉलमध्ये गेल्या सोमवारी एका मासिकाचा प्रकाशन समारंभ झाला. संध्याकाळी सहा वाजता अमुक एका मासिकाचा प्रकाशन समारंभ असंच जाहीर केलेलं होतं आणि तेच झालं. साहित्य परिषदेचा हॉल. सुसा मासिकाचा पहिला अंक. तो म्हणजे तोच अंक.

तर मघाशी सांगितल्याप्रमाणे वेळ संध्याकाळी सहाची. त्यात बाहेर दीर्घ प्रतीक्षित पाऊस अवतरतोय. बाहेर दीर्घप्रतीक्षित पाऊस आणि आत हे दीर्घप्रतीक्षित मासिक. संध्याकाळ आणि पावसाचा रंग. सगळं मिळून एक धूसर वातावरण आणि या छोट्या छोट्या दिव्यांच्या माळा. उगीच गजबजाट किंवा प्रखरता नाही. मोजकेपणा आणि सौम्यपणा. समारंभाला अगदी वेळेवर सुरुवात होतेय. श्री. बबनराव नावडीकर आपल्या गोड संथ आवाजात महाराष्ट्रगीत म्हणतायत. अजून माणसं येताहेतच. श्री. ना.वि.काकतकर सुहास्य वदनानं येणाऱ्या प्रत्येकाचं स्वागत करतायत. प्रत्येकाची दखल घेतायत.

पण हे एवढंच नाही. तीनचार सुंदर मुली प्रवेशव्दाराजवळ उभ्या आहेत. येणाऱ्या प्रत्येकाला अत्तर लावताहेत. गुलाबपाणी शिंपडताहेत. आत आलेला प्रत्येक माणूस एका आल्हादमय मनःस्थितीत आहे.

आता भाषणं ! हाताला अत्तर असलं आणि गुलाबपाण्याचा सुगंधी गारवा जरी सुखवत असला तरी भाषणं ! नाही म्हणजे या ठिकाणी सगळंच बिघडेल. तर सगळ्याच वक्त्यांना हे समजलेलं दिसून येतंय. सगळं आटोपशीर संपतंय. पण होतायत मात्र सगळ्या गोष्टी. मासिकाची माहिती, अध्यक्षांचे भाषण,उद्घाटन आणि उद्घाटन प्रसंगीचे दोन शब्द. तसंच वयोवृध्द, तपोवृध्द आणि ज्ञानवृध्द व्यक्तींचे आशीर्वाद, गुच्छ, आभार, सगळं पण सगळं कसं सहज मजेत.

इतर भाषणांत इथ फारसा पडत नाही. पण आपल्या श्री. नानासाहेब गोऱ्यांच्या भाषणाचा उल्लेख केलाच पाहिजे. हा जो या मासिकाचा पहिला अंक निघाला त्यातल्या बालकांच्या विभागात एक अतिशय कल्पक अशी स्पर्धा ठेवलेली आहे. बालकवींच्या 'श्रावणमास ' या कवितेतल्या ओळींवर आधारित काही चित्र-रेखाटनं यात दिलेली आहेत. ती मुलांनी रंगवायची. एका चांगल्या कवितेची - कवीची ओळख, चित्र रंगवण्याचा विशेष आनंद आणि संवेदनशीलतेला चेतना-- इतक्या गोष्टी यात साधतायत. आणि याच्या अनुषंगानं आणखी कित्येक. तर ही कल्पना नानासाहेबांना फार आवडली आणि त्यांनी या संदर्भातलं एक गुपित लोकांना सांगून टाकलं. या मासिकाच्या उद्घाटनाला येण्यापूर्वी हे गृहस्थ घरी आपल्या नातीबरोबर अर्धा-पाऊण तास ही चित्रं रंगवत बसले होते. हे टॉप वाटलं. मनमुराद आवडलं.

हे सगळं संपल्यावर जाताना एक गरगरीत पेढा आणि मरवावगुंठित गुलाब मिळाला. शिवाय सर्व उपस्थितांना हा प्रथम अंक भेट मिळालेला होताच.

आता तुम्ही म्हणाल की एकूण अंक कसा ? तर या सबंध समारंभाइतका गोड गोड आणि सुबक.

( ४ ऑगस्ट १९६८)

****

# अनिर्बंध संभाषण

आता संभाषण हा प्रकार शक्य व्हायला कमीतकमी दोन व्यक्ती तरी लागतातच. नाहीतर हिंदी सिनेमात दाखवतात तसले स्वतःच्याच मनाचे कमीत कमी दोन भाग तरी... मग तो तो विषय, परिस्थिती, व्यक्ती यावरून त्या संभाषणाचे नियम आपोआप तयार होतात. ' अनिर्बंध संभाषण ' म्हटल्यावर तुम्हाला काय वाटलं ? विषयाचं बंधन न पाळणारं ( म्हणजेच भरकटणारं ) वेळेचं बंधन न जुमानणारं आणि भाषेतले विधिनिषेध, सभ्यासभ्य विवेक न पाळणारं असं काहीतरी होय ना ? पण हे जरा वेगळं आहे.

माझा एक सुमारे सत्तरीतला दोस्त आहे.( यावरून तुम्ही माझ्या वयाचे अंदाज कराल तर ते साफ कोलमडतील.) एक आपला छोटासा भाबडा माणूस. आजपर्यंतच्या आयुष्यानं आपण कुणीतरी अगदी लहान आहोत -- अगदी क्षुद्र आहोत-- खुजे आहोत - हे या माणसाच्या मनावर इतकं बिंबलेलं आहे की त्यांच्या गढूळ डोळ्यांत सतत एक कातरता भरलेली असते. तो मग सारखा जगावर वैतागत असतो. मी शिकलेलो नाही, मला खोटं बोलता येत नाही, मला गळे कापता येत नाहीत-- मग या जगात राहायला खरं म्हणजे मला हक्कच काय -- असे मूलभूत प्रश्न हा माणूस विचारत असतो. यानं जग पाह्यलंय खूप आणि याच्याजवळ काहीच नसल्यानं त्यानं सगळं काही एका विक्षिप्त कुतूहलानं पाहिलेलं आहे. असंख्य बारकावे--तपशील लक्षात ठेवलेले आहेत. ती याची श्रीमंती. आणि त्याची ही श्रीमंती हाच त्याचा आजचा विसावा आहे. हे सगळं धन ओसंडू देणं हीच त्याची त्याच्या लहानपणातली एक मोठी पळवाट आहे.

'ही पाहिलीत जगाची रीत -- पैशासाठी माणसाला कशी वणवण करावी लागते ती।' असं काहीतरी अगदी ढिसाळ जरी आपण बोललो तरी हा माणूस लगेच मांडा ठोकून बसतो. मग तो जे बोलेले ते सगळं पैसा --वणवण इत्यादीबद्दलच असेल असं नाही. अक्षरशः शेकडो विषयांना हा माणूस एक अर्ध्या -पाऊण तासात स्पर्श करतो. तुम्ही मग हे सगळं अगदी लक्षपूर्वक ऐकलंच पाहिजे अशीही त्याची अपेक्षा नसते.... तर मी जे संभाषणाचं अनिर्बंधत्व म्हणतो ते हे. एरवीच्या संभाषणात श्रोत्यांवर जे काही सभ्यतेचे निर्बंध असतात तेही इथं असत नाहीत, म्हणजे समोरच्याच्या बोलण्याला स्वगताचं रूप देण्याचीही इथं मुभा असते. आणि यात काहीतरी चमत्कारिकपणा आहे याची रुखरुखही न लागता !

पण मी कित्येक वेळा या माणसाचं सगळं बोलणं लक्षपूर्वक ऐकतो. आधुनिक कुटुंबांतले नवरा-बायको-मुलं यांच्यांतले संबंध, एका कंडक्टरची आणि उतारूची बसमधली मारामारी,मटका,शाळेची फी म्हणून दिलेल्या पैशात चैन करून मोकळी होणारी मुलं, पूर्वीच्या माणसांचा धाक, प्रतिष्ठा काही छानछोकीपणात नसते, एका माणसानं मला कामाचे पैसेही दिले नाहीत, घरी गेल्यावर एक कप चहालाही हल्लीची माणसं कशी महाग आहेत, ब्रिटीशांच्या राज्यात भारत कसा होता, वगैरे वगैरे असं खूप...

आणि मग या सगळ्या अस्ताव्यस्त तुकड्यांचं एक प्रचंड जगच समोर उभं राहतं. या माणसाची वाताहात एक प्रचंड प्रश्न बनून समोर उभी राहते. या प्रश्नाला अर्थात आपण उत्तर द्यायचं नसतं. तो नुसता पाह्यचा असतो. एक माणूस म्हणून.

( १८ ऑगस्ट १९६८)

*****

# शूटिंग

खरं आहे. सिनेमाचं शूटिंग ही एक बघण्यासारखी गोष्ट आहे. एक म्हणजे पडद्यावरचे चेहरे आपल्याला जिवंत माणसांच्या स्वरूपात पाहायला मिळतात आणि दुसरं म्हणजे एकंदर त्या प्रकाराबद्दलच आपल्यापैकी बऱ्याच जणांच्या मनांत उत्सुकता असते. ही उत्सुकता ' संगम ' चित्रपटातील पुण्याच्या फलाटावर घेतलेल्या दृश्यात खच्चून दिसते.

मी मुंबईला एकदा 'प्यारका बंधन ' चित्रपटाचं शूटिंग पाहिलं होतं. त्या वेळचा घामाघूम झालेला 'भाई बाजू हटो, ये हमारे पेटका धंदा है ' वगैरे म्हणणारा दिग्दर्शक चांगला आठवतो. त्याच्या म्हणण्याप्रमाणे आम्ही बरेच लोक लांब उभे राहिलो. पण तरी त्या दृश्यांत इतर अनेकांच्या अनावश्यक चेहऱ्यांची गर्दी झालीच ! हे आपल्या अनेक भारतीय चित्रपटांतून दिसतं. ' गुमराह ' नावाच्या चित्रपटात शेवटी शेवटी फोर्ट विभागातलं एक दृश्य आहे-- रस्त्यावरून शशिकला जाते आहे असं दृश्य आहे. त्या दृश्यातली तिच्या मागची-पुढची गर्दी, तऱ्हेतऱ्हेचे चेहरे, डबेवाले लोक यांनी ते दृश्य भयंकर विनोदी झालेलं होतं.

पण परदेशी चित्रपटांतून असा चित्रपट--वास्तवाचा भंग झालेलं आपल्याला क्वचितच पाह्यला मिळतं. कितीही गर्दीच्या भागातलं दृश्य का असेना -- माणसं आपापल्या उद्योगात मग्न दिसतात. गर्दीतला एखादा मनुष्य सहज म्हणून दृष्टिक्षेप टाकताना दिसतो. ते तेवढंच. ' फाईन मॅडनेस ' या चित्रपटातली कवीची बायको त्या कवीच्या डॉक्टरामागून भर रस्त्यात विनवण्या करीत चाललेली एका गर्दीच्या दृश्यात दिसते पण या गर्दीतला एकही माणूस त्या दोघांच्या मागून आनंदाने, सुहास्य वदनाने हा प्रकार पाहताना दिसत नाही. जो तो आपापल्या पध्दतीने जाताना दिसतो आणि म्हणूनच त्या दृश्याचा जिवंतपणा आणि खरेपणा अबाधित राहतो. ' संगम ' सारख्या आपल्या चित्रपटांत असलेली परदेशांतली दृश्यंही या कारणासाठी वैशिष्ट्यपूर्ण वाटतात. अलीकडच्या ' नई-रोशनी ' या चित्रपटातील एका दृश्यात या खरेपणाची प्रचिती येते. ' किस तरह जीते हैं ये लोग बता दो यारों ' या गाण्याच्या वेळी रस्त्यावरचे मजूर वा इतर वाहतूक यांच्यात शूटिंगची जाणीव कुठेही दिसत नाही. या दृश्यात जर हसत उभे असलेले लोक दिसले असते तर काय झाले असते याची कल्पना अर्थात मनोरंजक होईल.

या सगळ्यातून काही महत्वाचे प्रश्न निर्माण होतात. कलेतल्या वास्तवाबाबतचे प्रश्न आपण सोडून देऊ. ( अलिकडे कलेतल्या वास्तवाचा हेतुपुरस्सर-- मुद्दाम भंग करण्याची काही तंत्रं काही युरोपियन नाटककार वापरतात असे ऐकिवात आहे.) चित्रीकरणाबद्दल हे जे कुतूहल आहे ते केवळ आपल्याकडच्या तांत्रिकीकरण-विज्ञान इत्यादी गोष्टींच्या नवलाईमुळेच आहे काय ? की आपला आळशीपणा आणि निरुद्योगीपणा यांचा हा परिणाम आहे ? की आपण मूर्ख आहोत ? आता असंही म्हणता येईल की हे उथळ आकर्षण आपल्या चित्रपटांनीच निर्माण केलेलं आहे. त्यांनी कलेपेक्षा भपका आणि मानव देहाचं स्तोम अधिक महत्त्वाचं मानल्यामुळेच हे असं झालेलं आहे. पण चित्रपट निर्माते ही जबाबदारी पुन्हा आपल्यावरच टाकू शकतील. लोकांना हवं ते आम्ही देतो असं म्हटल्यावर अर्थातच ते बिनतोड होणार. म्हणजे मग सांस्कृतिकदृष्ट्या आपण सगळेच खालच्या दर्जाचे आहेत असा याचा सारांश काढायचा काय ?

शिक्षणाचा प्रसार आणि औद्योगिकीकरण या गोष्टी आपल्याकडे अजून खूपच मागे असल्यामुळं इथल्या माणसांच्या आयुष्याला तितका वेग नाही असं एक समर्थन निघू शकेल. पण हीच वेगाच्या आवश्यकतेची महत्त्वाची कारणं मानता येणार नाहीत का ?

( २५ ऑगस्ट १९६८.)

*****

# दोन फुलं

माणसानं कायदेकानू करून आणि मग ते पाळणं किंवा न पाळणं वगैरे वगैरे जरा मजेदारच वाटतं नाही काही काही वेळेला ? पण आता सुव्यवस्था पाहिजे तर कायदा पाहिजेच. कारण एरवी माणूस हा काही तितकासा माणसाळलेला प्राणी आहे असं म्हणण्यासारखी परिस्थिती नाही.

तर आता कायदा आणि सुव्यवस्था एकदा पाहिजे म्हटलं की त्यांचं रक्षण होणं हे आवश्यक. त्यासाठी काही खास माणसं आवश्यक. ( ही माणसं ज्या ज्या क्षेत्रांतल्या कायद्याचं रक्षण करण्यासाठी त्यांना नेमण्यात येतं त्या त्या क्षेत्रातले कायदे किमान पाळणारी असली म्हणजे झालं !) पण कायदा म्हणजे काही कोलीत नव्हे एवढं मान्य व्हायला हरकत नाही. मान्य ?

तर पुण्यातली ' कॅन्टोनमेंट पब्लिक गार्डन ' तशी काही अत्यंत समृध्द-भपकेबाज किंवा भयंकर आकर्षक वगैरे अशी काही  जागा नाही. पण तरी बाग म्हणजे फुलं आलीच.  तर दुपारच्यावेळी ही बाग बंद असते. फाटक लावलेलं असतं. असो. तिथंच-- बागेतली फुलं तोडू नयेत -- की फुलाला हात लावू नये वगैरे वगैरे अशी एक स्पष्ट ठळक पाटी. तीही असो.

प्रसंग घडला तो असा. साधारण अठरा-एकोणीस वर्षांचा एक मुलगा होता. साधाच -- काहीशा मळक्या कपड्यांतला. तो त्या बागेच्या जवळपास होता. तेवढ्यात एक रिक्षा आली. त्याच्याजवळ थांबली. आत दोन सुंदर तरुणी. एकीचा -- साडी वगैरे पांढरा शुभ्र पोषाख, दुसरीचा -- पंजाबी. त्यांनी त्याला विनंती केली, " आम्हाला दोन फुलं दे ना काढून. " ( संभाषण इंग्रजीत. ) त्या मुलानं त्यांना सांगितलं की गावात फुलांची खूप दुकानं भरलेली आहेत. तिथं जाऊन विकत घ्या. त्या म्हणाल्या की आम्हाला इथली दुकानं वगैरे ठाऊक नाहीत आणि आम्हाला मुंबईचा ट्रंक आल्यानं आम्ही आता मुंबईला चाललोय आणि आम्हाला केसात माळण्यासाठी फक्त दोनच फुलं हवीत. एवढं म्हटल्यावर त्यालाही वाटलं की द्यावीत. लांब देठाची दोन मोठी फुलं त्यानं तोडून आणली आणि फाटकाच्या तिथून त्यांना दिली. त्या थँक्स वगैरे म्हणून परत फिरतायत तेवढ्यात माळीबाबा कुठून उपटले कोण जाणे. त्यानं त्या मुलाला धरलं.

आली का पंचाईत. पंजाबी पोषाखातली रिक्षात जाऊन बसली होती. शूभ्र पोषाखातली बाहेर होती. तिचं लक्ष गेलं. माळ्यानं चक्क त्या मुलाची कॉलरच धरलेली होती. ती पुढं गेली. फुलं तिच्याच हातात होती. तिनं त्या माळ्याला हाक मारली. त्या मुलाची काही चूक नाही -- आमची चूक आहे वगैरे सांगण्याचा ती प्रयत्न करू लागली पण माळी आपला बहिरा असल्यासारखा त्या मुलाला हिसकत बडबडत उभा. तिनं त्या दुसरीलाही रिक्षाबाहेर बोलावलं. दोघीही विनवतायत अन माळी आपला एखादा सूड उगवत असल्यासारखा बहिरा आणि आंधळा. शेवटी माळ्यानं फाटकावरनं त्या मुलाला बाहेर आणलं. ( आता इथं जमत जाणाऱ्या गर्दीचा उल्लेख करायलाच पाहिजे असं काही नाही !) 'कहाँ ले जा रहे हैं उसे ? ' शुभ्र मुलगी विचारते. माळी आपला कडकपणे 'चौकीपे ' म्हणून पुन्हा आपला सुरू. 'व्हाट नॉन्सेन्स, ओन्ली फॉर टू फ्लॉवर्स'  ती मुलगी वैतागते.  लोक आपले - अरे जाऊ दे-- द्या सोडून वगैरे करतायत. 'ही घे बाबा तुझी फुलं आम्हाला नकोत' असं म्हणून त्या मुली परत आपल्या रिक्षात जमा झाल्या नाहीत हे विशेष. त्याही चौकीवर निघाल्या. तो मुलगा त्यांना म्हणतोय की ही काही फार मोठी गोष्ट नव्हे -- मी त्यांना विनंती करीन -- तुम्ही नका येऊ, वगैरे वगैरे. शेवटी अर्थात माळ्यानं त्या मुलाला सोडून दिलं.

आता बागेतली फुलं तोडणं हा गुन्हा आहे ना ? मग झालं तर. हे एवढं तरी कमीत कमी केलं नाही तर लोकांना नियमांचा धाक कसा राहणार ?

बरोबर आहे. बागेच्या आतली फुलं फुलवायची -- जपायची असली तर बागेबाहेरच्या फुलांची पर्वा करून कसं चालेल ?

( १ सप्टेंबर १९६८)

*****

# सर्दी -- एक अवस्था

तुम्हाला मधून मधून -- म्हणजे काही महिन्यांतून म्हणा, किंवा वर्षातून म्हणा-- अशी सर्दी होते का हो ?होते ना ? हां. तर तिच्याबद्दलच बोलावं म्हणतोय. होते म्हणजे सर्वसाधारणपणे प्रत्येकाला कधी ना कधी सर्दी होतेच असं गृहीत धरून चालायला हरकत नाही. म्हणजे आपण इथं ते गृहीत धरूच असं मला म्हणायचंय.

एरवी आपण काय अगदी गढलेले असतो नाही आपल्या स्वतःच्या आयुष्यात ?अगदी म्हणजे अमुक एक प्रसंग -- क्षण हा आपल्या आयुष्यातला -- आपला आहे तर त्याच्याबद्दल आपणच काय तो निर्णय घ्यायला हवा अशी आपली भूमिका असते. मग आपण कशात तरी रंगत असतो, कशात तरी कंटाळत असतो, सुखावत असतो, चिडत असतो, खिन्न होत असतो, उव्दिग्न होत असतो,वगैरे वगैरे. सारांश आपण सरळ सरळ गोवलेले-- गुंतलेले असतो ना ? हां.

आता सर्दी झाल्यावर काय होतं पहा. प्रथम तुम्हाला -- पाहिजे तर आपल्याला म्हणा-- आपल्याला एखाद्या नाकपुडीत असं हुळहुळल्यासारखं होतं. आपण नकळत चेहरा उचलतो. एक-दोन क्षण आणि साटकन् शिंक येते. ही पहिली. हिच्या मागोमाग शिंकांची एक पलटणच्या पलटण येते. सडा--सड, सडा--सड,सडा--सड, हे असं थोडा वेळ. या सगळ्याचा आपण लवकरच असा निष्कर्ष काढतो की आपल्याला सर्दी झालेली आहे. आणि आपला एक मूड तयार होतो. आपला कसला, सर्दीचाच एक मूड तयार होतो. कारण तो मूड 'आपला ' वाटत असेल तर ती खरी सर्दी नव्हेच. तर हा मूड म्हणजे -- जणू काय प्रत्येक शिंकेसरशी आपल्याला हिसकून हिसकून असे जगापासून -- एकूणच सगळ्यापासून असं लांब लांब आणण्यात आलेलं असतं. हा मूड पूर्ण पक्वतेपर्यंत पोचणं म्हणजेच सर्दी--समाधी लागणं. सुरुवातीला आपण काहीतरी वाचावं किंवा रेडिओबिडिओ ऐकावा वगैरे वगैरे विचार करतो. काहीच नीट जमत नाही हे लक्षात आल्यावर थोडे त्रासतो. थोड्या वेळानं मग हे सत्य आपण सत्य म्हणूनच पाहू लागतो आणि मग अर्थात तो त्रासिकपणा मावळतो. इथं समाधी लागते.

काय ही माणसं उगीच सतत बोलत असतात ! ह्या ! विनाकारण सगळं ! हे असं सुरू होतं. रस्त्याकडे पाहावं तर -- अं ? ही इतकी सगळी माणसं सारखी कुठं एवढी जात येत असतात -- अं ? असे विचार येतात. प्रत्येक नाकपुडीत जणू काय एकेक टाचणी ठेवलेली आहे आणि ती बाहेर पडू देता कामा नये असे आपण बसून असतो. मधेच एखादी टाचणी आतल्या आत उभी होते, टोचते तेव्हा सडाड्. बाकी शांत. डोळे असे ओलसर-- बारीकसर. ( नाकाजवळच्या अश्रुग्रंथी वगैरे काय काय डॉक्टर सांगतात !) आणि आपण जणू काय एकूणच खूप लांब लांब आहोत. ही कुटुंबं न् हे संसार न् हे कष्ट न् हे शिक्षण न् हे राजकारण न् हे देश-बीश, धर्म-बीर्म ...हे सगळं कुठे चाललंय शेवटी ! आँ ! काय आहे काय हे सगळं ? -- हे असं थोडा वेळ चाललं की मग एक छानपैकी अशी मूढ अवस्था तयार होते, वाह ! तिचं काय वर्णन करावं ! अगदी अवर्णनीयच ! विश्वाचे गूढ साकळून आपल्या सबंध शरीरात कोंदाटलंय जणू काय ! -- हा या समाधीचा परमोत्कर्ष ।

रत्नाकर मतकरींची ' आनंदाचा दवाखाना ' नावाची एक लहान मुलांची नाटिका आहे. त्यात माणसं आनंदानं दिलेले लालीपॉपस् चाटतात आणि कंप्लीट बदलत जातात अशी काही कल्पना आहे. म्हणजे असं की सारखा चिडचिड करणारा कंपौंडर -- आनंदा चांगला आहे, आनंदा गोड आहे, आनंदा समजुतदार आहे -- वगैरे वगैरे बोलू लागतो. तसाच काहीसा हा सर्दी-स्पर्श. या स्पर्शानं जणू काय आपण भवसागर तरून जातो. आपल्याला जसं वाटतं तसंच हे जग आहे कशावरून ? मी इथं पुण्यात बसलोय असं मला वाटतंय पण मी खरा दिल्लीत असून तिथं मला नुकतीच काळा बाजार केल्याच्या आरोपावरून अटक होत असल्याचं दृश्य लोक पाहात नाहीयत हे कशावरून ? ज्याच्या त्याच्या समजुतीप्रमाणे जग ज्याला त्याला दिसत असेल !

असल्या मूर्ख विचारांनी आयुष्याचा पायाच ढासळल्यासारखं वाटतं का ? पण भ्यायचं कारण नाही. कारण दोनतीन दिवसात सर्दी हटते आणि पुन्हा आपण आपल्या पायांवर उभे राहतो. आपापले सीरियस रूटीनवाले होतो. रंगतो, कंटाळतो.

(८ सप्टेंबर १९६८)

*****

## सत्य

एक होते प्राध्यापक. पण ते काही नुसतेच प्राध्यापक नव्हते. विभाग प्रमुख वगैरे काय ते तेही होते. मुख्य म्हणजे ते डॉक्टर होते. आता त्यांचा विषय विचाराल तर तो होता मानसशास्त्र, म्हणजे गहनच ! ते असो. तर ते मानसशास्त्राचे गाढे व्यासंगी वगैरे होते. तरी ते जरा म्हणजे वाजवीपेक्षा जास्तच चिडखोर होते. हे जरा अधिक विशद करायचं झालं तर असं करता येईल. म्हणजे गंमत अशी होती की त्यांना आपलं प्रत्येक विषयातलं निर्विवाद सत्य कळलेलं असायचं. सगळीकडं आपला स्वच्छ सूर्यप्रकाश ! तर इतकं स्वच्छ असं सत्य ते धडधडीत सांगत असताना कुणीतरी आपला येतो व मतभेद वगैरे गोंडस नावाखाली सत्यापेक्षा काहीतरी वेगळं बोलतो याचा अर्थ काय ! ते संतापत. असल्या मूर्खपणामुळंच आपलं राष्ट्र खड्डयात चाललं असल्याचं आणखी एक सत्य सांगत. हां...आणखी एक -- ते काही नुसतेच मानसशास्त्रज्ञ नव्हते, तर एक निष्ठावान, समर्थ वगैरे असे एक राष्ट्रभक्तही होते.

तर हे गृहस्थ अर्थातच निरनिराळ्या ठिकाणी भाषणंही करीत. एका भाषणात ते असं म्हणाले की, काही नाही, आपण सर्वांनी आता कंबर कसून कामाला लागलं पाहिजे. अरे, जर्मनी पाहा, जपान पाहा. आपलं राष्ट्र जर आपल्याला पुढं न्यायचं असेल तर आपल्याला वीस वीस तास कामं केली पाहिजेत. झालं काय की सुरेश भिडे नामक एका तरुणानं हे भाषण ऐकलं. नाही म्हणजे ऐकलं म्हणून काही नाही पण ही स्वारी आपली दुसऱ्या दिवशी प्राध्यापक महाशयांच्या घरी गेली.

प्राध्यापक महाशय सत्यवादी असल्यामुळं जरा आपले करडेच. ' बसा ' ते चेहरा करडा ठेवूनच म्हणाले. भिडे बसला. त्यानं लगेच सुरूच केलं. तो त्यांना म्हणाला की, तुमचं कालचं भाषण मी ऐकलं आणि मला ते फारच आवडलं. आपल राष्ट्र पुढं गेलंच पाहिजे. तर मला तुम्ही कसलंही काम द्या. बौध्दिक श्रमाचं द्या, शारीरिक कष्टाचं द्या, कसलंही द्या. झाडू मारणं, वगैरे, अमुकतमुक काहीही सांगा. मी त्यात माझी प्रतिष्ठाच मानेन आणि मुख्य म्हणजे मी वीस-वीस तास काम करायला तयार आहे. आणि ते मी करू शकेन एवढा माझ्यात खंबीर आत्मविश्वास आहे. सांगा, काय करू ? -- प्राध्यापक महाशय जरा पाहातच राहिले. मग म्हणाले की अहो -- असं -- म्हणजे एकदम असं कसं... तर भिडे म्हणाला की ह्यॅ !हे असलं नाही उपयोगी. अहो टिळक म्हणायचे की मला असे चार तरुण द्या...आता टिळक होते तेव्हा मी अजून म्हणजे नव्हतोच ते सोडा. पण आता टिळक नसले तरी तुम्ही आहात आणि मुख्य म्हणजे मी वीस वीस तास काम करायला तयार आहे. बोला, काय करू ? -- मग प्राध्यापक महाशय म्हणाले की काय आहे, सदाशिवरावांना विचारून मग मी तुम्हाला काय ते सांगेन. भिडे म्हणला केव्हा येऊ ? ते म्हणाले ' अमुक तारखेला. ' तर त्या तमुक तारखेला भिडे हजर. हां तर तुम्ही ते भिडे नाही का, वगैरे वगैरे झालं. तरी सुध्दा काही टळू शकला नाहीच. तर ते सदाशिवराव परदेशात गेलेले आहेत म्हणून अजून म्हणजे...भिडे म्हणाला ठीक आहे, पुन्हा केव्हा येऊ ? पुन्हा सांगितल्या तारखेला भिडे हजर. तेव्हाही तेच. मग तो म्हणाला की हे बघा, तुम्हाला जर प्रत्यक्ष त्यांच्याशी बोलवत नसेल तर मला चिठ्ठी द्या. ते एवढे उद्योगपती आहेत तर मला ते वीस तास काम सहज देऊ शकतील. प्राध्यापक महाशय म्हणाले की, अहो ती मोठी माणसं. .भिडे म्हणाला ह्यॅ ! हे असलं नाही उपयोगी. मग ते म्हणाले बरं, तुम्ही आमच्या वर्कशॉपमध्ये करता काम ?( त्यांच्या संस्थेचं वर्कशॉप होतं. )-- हो करतो की, भिडे म्हणाला. मग तो म्हणाला की आपण व्यवहाराचं काय ते बोलू. मी जी नुकतीच नोकरी सोडली तिथं मला साडेतीनशे मिळत होते...प्राध्यापक म्हणाले, नाही म्हणजे वीस नाही, पंधरा तास करा तुम्ही काम. अहो पण हे पैशाचं काय बोलताय ? भिडे म्हणाला, म्हणजे ? फुकट काम करायचं ? ते म्हणाले, नाही हो, म्हणजे फुकट नाही पण थोडाफार त्याग करावाच लागेल. शंभरच्या आसपास मिळतील.

त्यांचं पुढचं सगळं संभाषण द्यायला इथं काही जागा नाही. ते आपण सोडून देऊ. कारण तेच तर सर्वात महत्त्वाचं आहे. असो.

(१५ सप्टेंबर १९६८)

*****

# लंबहस्त

उपाशी राहावं लागावं -- उपाशी राहावं लागावं -- पण किती ? अगदी असं आसन्नमरण अवस्थेत रस्त्यात कोसळेपर्यंत ? हे भयानक आहे. खरंच.

आता ते उपासामुळे होतं की आणखी कसल्या आजारामुळे हे काही निश्चित कुणालाच सांगता आलं नसतं. पण ते दृश्य पाहून लोकांनी जे अनेक तर्कवितर्क सुरू केले त्यातला उपास हा एक महत्त्वाचा तर्क होता.

ते गाढव असं चालता चालता रस्त्यात कोसळताना कुणीतरी पाहिलं. मग दोन-चार तुरळक पोरंसोरं जमली. गाढव आपलं जास्त जास्तच ढिलं पडत चाललं. केविलवाण्या डोळ्यांनी थिजू लागलं. जणू काही जग एकदा शेवटचं पाहून घेण्यासाठी ते डोळे उघडे ठेवण्याचा क्षीण प्रयत्न करतंय.

हा प्रकार रंगरावांच्या घरासमोर चाललेला होता. काय प्रकार आहे म्हणून पाह्यला ते बाहेर आले. मग ते पुढं झाले. जवळ जाऊन पाहू लागले " अरे ते थकलेलं दिसतंय फार " -- ते म्हणाले. '' अरे गणू, आपण त्याला काही तरी खायला घालू. गणू पोळी आण बरं आतून एक. " -- त्यांनी गाढवाशेजारी बसलेल्या आपल्या चिरंजीवाला फर्मावलं. गणू अर्थातच आत गेला आणि एक पोळी घेऊन आला. त्यानं ती पोळी त्या गाढवाच्या समोर टाकली.

पण ते गाढव म्हणजे भयंकरच क्षीण पडलं होतं. पोळी टाकली तरी हूं नाही की चूं नाही. मग रंगराव पुढं झाले. त्यांनी ती पोळी उचलली आणि ती ते त्या गाढवाच्या तोंडात भरवू लागले.

आता रंगरावांसारखा प्रतिष्ठित आणि सुसंस्कृत माणूस. एवढा घास देतोय हे पाहून मंदसं हसून गाढवानं जबडा उघडला. पण झालं काय की पोळी त्या जबड्यात ठेवून रंगरावांचा हात बाहेर येण्यापूर्वीच त्याचा जबडा मिटला गेला. अशक्तपणामुळे एवढाही वेळ जबडा उघडा ठेवणं गाढवाला शक्य झालं नसावं.

अर्थातच हातात पोळी असलेल्या अशा रंगरावांच्या पंजात त्या गाढवाचे दात रुतले गेले. रंगरावांनी एकदम "हुश्य " केलं आणि त्यांनी हात मागे घेण्याचा प्रयत्न केला. पण त्या आसन्नमरण गाढवात पुन्हा जबडा उघडण्याची काही ताकद राहिली नव्हती !

आली का पंचाईत ! हात तर आत अडकलेला आणि गाढव हळूहळू मरत चाललंय.

अर्थातच लोक जमू लागले. जो तो येऊन बघतोय तर आपला भर रस्त्यात हा माणूस गाढवाच्या तोंडात हात देऊन बसलेला ! हसावं का रडावं हे कळेना -- असं म्हणण्याच्या दृष्टीनं ही म्हणजे भलतीच चपखल सिच्युएशन निर्माण झालेली होती. काही हसू लागले, काही गंभीरपणे प्रयत्न करू लागले. काही हसत गंभीरपणे प्रयत्न करू लागले...कुणी हातानं जबडा फाकण्याच्या प्रयत्न केला कुणी उलथनं वापरून पाहिलं. गाढवाला दोन रपाटे घालून पाहिलं पण निळ्याभोर आकाशाखाली गाढव आपलं थंड !

शेवटी कुणाच्या तरी डोक्यात एक रामबाण तरकीब आली. त्यानं एक काटकी आणली. ती मोडून तिच्या दोन केल्या आणि या नाकपुडीत एक आणि त्या नाकपुडीत एक अशा खच्चदिशी ठोसल्या. त्याबरोबर त्या गाढवानं उंदरासारखा 'ची' कन् आवाज काढून जबडा वासला.रंगरावांनी लगेच हात बाहेर काढून घेतला. लोक हाश हुश करत ' वा ! शाबास ! ' म्हणतायत तोवर गाढवानं पाय ताठ केले.

रंगराव अर्थातच तो हात घेऊन दोघाचौघांबरोबर दवाखान्यात गेले. डॉक्टर म्हणाले, ' काय झालं हो ? ' रंगराव म्हणाले की, गाढवं चावलं. डॉक्टर हसायलाच लागले. काय ज्योक बीक मारताय काय ? -- त्यांनी हसतच विचारलं. मग अर्थात इंजक्शनं वगैरे सगळे सोपस्कार आलेच.

आता सध्या परिस्थिती अशी आहे की कुठूनही रंगराव आले की लोक आपले हसायलाच लागतात. परवा तर एका खट्याळ पोरानं मुद्दाम जाऊन त्यांना बातमी दिली की पलिकडच्या चौकात एक उपाशी कुत्रं पडलंय म्हणून.

सारांश, दयेचा हात पुढे करताना देखील गाढवापासून चार हात लांबच असावे नाही तर लंबहस्त ही पदवी मिळते.

(२२ सप्टेंबर १९६८)

*****

# माणसाचं मरण

सुरेश भिडेचा एक किस्सा मागे मी सांगितलेला आहेच, त्यावरून साधारणपणे तुम्हाला या वल्लीची कल्पना आली असेलच. तर हा एक आपला जानी दोस्त आहे. सनसनाटी आणि थंड ...प्रत्येक गोष्टीचा पाया हलवून पाहणं हे या माणसाचं ब्रीद.

एक दिवशी तो आला आणि आल्या आल्या तडक त्यानं एक प्रश्न टाकला. " काही काही लोक असे चिडखोर का असतात सांग बरं ?'' मी क्षणभर त्याच्याकडे पाहिलं. " का कुठं खटका उडाला वाटतं ?'' मी विचारलं."खटका-बिटका सोड. असल्या फालतू गोष्टी आपण मनावर घेत नाही. प्रश्नाचं उत्तर दे." तो म्हणाला. मग मी जरा सावरलो. म्हटलं या बेट्याचं म्हणणं तरी काय आहे ते बघू. " तसं काय, सगळेच लोक थोडेफार चिडखोर असतात. तू जर चिडखोर नसशील तर आपण एक मठ देऊ बांधून तुला अर्थात फंड गोळा करून "-- मी.

" तसं नव्हे रे " तो समजावून देऊ लागला. " माणसं चिडतात आणि माणसं चिडखोर असतात यात फरक आहे की नाही ?"

'' प्रमाणाचा फरक. दुसरा कसला ? " मी आणखी डिवचलं.

" तर तुला सरळ बोलायची इच्छा नाही. नसो. मी बोलतो." त्यानं सुरू केलं." विशेषतः कंडक्टर्स, कारकून पोस्टमन वगैरे जे पेशे आहेत नं -- त्यात असे चिडखोर लोक जास्त असतात. यातल्या बऱ्याचशा लोकांचं होतं काय की आपण सामान्य आहोत हे त्यांना पटतच नाही. त्यामुळं आतल्या आत कुठं तरी त्यांची महत्त्वाकांक्षा धुमसत असते. सारांश, म्हणजे हे विशिष्ट पेशे वगैरे सोडून बोलायचं झालं तरी असं म्हणता येईल, आपण लाईफमध्ये अयशस्वी आहोत अशी भावना जर माणसात रुजत चालली तर अनेक शक्यतांपैकी तो चिडखोर होण्याची शक्यता फार. मग ही माणसं आपला आहे तो तुटपुंजा अधिकार गाजवण्यात आनंद घेऊ लागतात--कुठंतरी आपलही वर्चस्व आहे अशा समजुतीची त्यांना गरज वाटायला लागते आणि इतकं करूनही ही माणसं आतून पोखरली जात असतातच."

'' बरं मग ? अरे आपली आहे याहून अधिक प्रगती व्हावी असं जर वाटलं माणसांना तर काय बिघडतं ?'' -- आणखी एक चावी.

''माणसानं आपले स्वभाव--आपले गुणधर्म ओळखून आपल्या कुवतीच्या पराकोटीनं फुलावं -- बाकी तुलना--बिलना भंपक गोष्टी हव्यातच कशाला ! हा सगळा एक प्रचंड गाढवपणा आहे. आपण आहोत तसं आपण आपल्याला पाहिलं तर वरचं हे आभाळ काय नाहीसं होणार आहे का ? ही माणसं साली अशीच मरणार हळू-हळू-हळू-हळूशी ! मरण ही फक्त शारीरिक घटना पाहिजे. मनानं मरत जाणं ! थू ! माणसं स्वतःच्या आयुष्याला एखादं असं काल्पनिक महत्त्व देऊ पाहतात आणि मग -- खुळचट ! ही माणसं डोक्यावरचं आकाश-बिकाश पाहात नसावीत कधीच."

" शांत हो. शांत हो."  -- मी.

''खुळा आहेस. मी बहकलेलो नाहीच. बहकलो तर बहकलोय असं म्हणण्याएवढी ताकद आहे माझ्यात. तर असो..आता तू म्हणशील की हा विषय कशावरून निघाला -- सायकलऐवजी मी बसनं तुझ्याकडे आलोय. कंटक्टर महोदय आणि उतारू महोदय यांच्यातले प्रेमालाप ऐकले आणि..."

गंमतच आहे झालं. या माणसाचं बोलणं आपण लाईटली घ्यायला जावं तर कधी आपण लक्षपूर्वक ऐकायला लागलो हेसुध्दा ध्यानात येत नाही.

( २९ सप्टेंबर १९६८ )

*****

# छिद्रान्वेषण

' छिद्रान्वेषण ' हा शब्दच इतका कंटाळवाणा आणि अवघड आहे की फक्त निरुद्योगी लोकांनीच त्याच्याशी व्यवहार करावा. सुसंसकृत माणसांना त्याचं एवढं विशेष असं काही वाटणार नाही हा भाग वेगळा. संस्कृत कच्चं असलं म्हणजे हे असं होतं. तर छिद्रान्वेषण म्हणजे दुसऱ्याचे किंवा कशातलेही दोष काढत बसणे. अशा प्रकारच्या वृत्तीला आपण काही चांगलं समजत नाही. ती वृत्ती हा आपण एक दोष मानतो. आणि तो कोणाकोणात आहे त्याचा शोधही आपण घेत असतो.

पण हा प्रकार एका शास्त्रज्ञानं केलेला आहे असं कळलं तर तुम्हाला म्हणजे तुम्हा-आम्हाला काय वाटेल ? छिद्रान्वेषण ही मानसशास्त्राची एक खास शाखा आहे असं कळलं तर !? तर आपल्याला जरी आश्चर्य वाटणार असलं तरी या सिध्द झालेल्या आणि शिवाय व्यवहार्य गोष्टी असल्यामुळं तशी काही हयगय चालणार नाही. आता इथं शास्त्रज्ञांची नावंबिवं देऊन बोअर करत बसत नाही. डिटेलवार बोलण्यापेक्षा मुख्य मुद्दा काय तो सांगून टाकतो.

आपल्या बुबुळाला छिद्रं असतात. त्यांचा संबंध डायरेक्ट मेंदूशी असतो. म्हणजे मुद्दा असा की त्यांच्यावर आपला ऐच्छिक ताबा नसतो. एखाद्या गोष्टीबद्दल आपण खरोखर उत्सुक असलो -- ती गोष्ट आपल्याला आवडत असली -- अनुकूल वाटत असली -- तर ती छिद्रं फुलतात -- मोठी होतात. याउलट एखाद्या गोष्टीचा आपल्याला तिरस्कार वाटत असला -- व्देष वाटत असला -- भय वाटत असलं, तर ती छिद्रं आकसतात -- आकुंचन पावतात. आणि हे सगळं आपल्या आवाक्याबाहेरचं ! डोळे हे मनाच्या का हृदयाच्या -- खिडक्या असतात असं पूर्वी कुठलातरी कवी म्हणून गेला. त्याचा शास्त्रज्ञांनी असा सूड घेतला !

आता कुत्र्यामांजरांवरचे प्रयोग आपण सोडून देऊ आणि माणसांतल्या कुत्र्यामांजरांकडे वळू. एका बाईनं आपल्या इच्छेनं - प्रयत्नपूर्वक आपली अशी ठाम समजूत करून घेतलेली होती की तिला नवचित्रकला फार आवडते..( फॅशन म्हणा -- सुसंस्कृतपणा म्हणा -- काहीही म्हणा.) पण आपल्या शरीरावरचे डोळे नामक अवयव 'संत' असतात हे ती विसरली. डोळे खोटं बोलू शकत नाहीत. शास्त्रज्ञांनी तिच्या डोळ्यांच्या छिद्रांमध्ये निरनिराळ्या प्रकारच्या चित्रांमुळे होणारे फरक अभ्यासले आणि असं सिध्द केलं की त्या बाईला खरं म्हणजे नवचित्रकलेचा तिटकारा आहे !

पध्दत अशी--बुबुळाचे सेकंदाला दोन फोटो घेण्याची व्यवस्था करून त्या व्यक्तीला समोरच्या पडद्यावर निरनिराळी चित्रं दाखवायची आणि त्या त्या चित्राच्या संदर्भात छिद्राच्या आकुंचन-प्रसरणातले फरक तपासायचे. चुकीची अजिबात शक्यता नाही. जे काय असेल ते शंभर टक्के सत्य. आणि शास्त्रज्ञांचा असा दावा आहे की, गुन्हेगारीच्या क्षेत्रात, शिक्षणक्षेत्रात ( ही दोन्ही क्षेत्रं एकत्रितपणे घेण्यात तसा इथं काहीच उद्देश नाही ) वगैरे या पध्दतीचा खूपच उपयोग होईल. खऱ्याखोट्याचा शोध घेणं -- आवडी निवडीचा शोध घेणं हे आता सहज शक्य होईल.

कॉम्प्युटर्सच्या साहाय्यानं -- नव्हे आज्ञेनं -- लग्नं लागताहेत, माणसाच्या ' स्मृती ' चा शास्त्रीय शोध सुरू असून निरनिराळ्या संस्कारांच्या हिताहिताचा शास्त्रीय पध्दतीनं बोध घेतला जातोय, प्रयोगशाळेतच माणसाची शास्त्रीय वाढ करण्याची भाषा बोलली जातेय, आणि माणसाच्या व्यक्तिगत विचारांची सुध्दा गुप्तता राहण्याची शक्यता नाहीशी होतेय -- हे सगळं कशाचं निदर्शक !? या सगळ्याचा अर्थ एवढाच की ' शास्त्र ' नामक एक नवी नियती माणसाचा कब्जा घेते आहे. भाबडे लोक म्हणतील की ही नियती म्हणजे त्या मूळ 'मोठया' नियतीचा एक भाग आहे. सगळं आपलं परस्पर ठरतंय.

माणूस आपल्या स्वातंत्र्याच्या पुळचट कल्पनांमधला खुळचटपणा कधी पाहणार ?

( ६ ऑक्टोबर १९६८ )

*****

# वंशावळ

आपण आपली सामान्य माणसं. आपल्याला कसली आलीय वंशावळ असा एक आपला छोटासा विचार. वंशावळ वगैरे प्रकार इतिहासातल्या राजेरजवाड्यांचा, मोठ्या लोकांचा. आपण आपले पोटार्थी, सभ्य, निरुपद्रवी, रूटीनवाले.

पण परवा या असल्या विनयशील विचारांना धक्का बसला. म्हणजे काही काही माणसं आपल्या घराण्याच्या इतिहासात जाम इंटरेस्ट घेऊन असतात असे मोघम ऐकून होतो, पण प्रत्यक्ष पाहण्याचा योग परवा आला. तुमच्या आमच्या सारखंच एक कुटुंब. त्या कुटुंबातल्या वडील माणसाच्या आजोबांनी ही वंशावळ मुद्दाम तयार करून घेतली. पाहू. हा प्रकार पाहिला की वाटतं, तो माणूस भयंकरच व्यापक असला पाहिजे.

आता इतिहासात वंशावळ हा प्रकार आपल्याला वैताग देतो हे खरं. तिथं ते सगळं आपल्याला रुक्ष वाटतं. पण ही वंशावळ पाहिली आणि वंशावळीबद्दलचा व्देष नाहीसा झाला. नकाशामध्ये जसं कापड गुंडाळलेलं असतं तशीच एक मोठी गुंडाळी. ती आपण जणू काय रामचंद्रपंत अमात्य काही खास लखोटा उघडताहेत अशी उघडायची. पाहिल्यांदा आपल्याला जुनेपणा जाणवतो. त्या प्रमाणात आपले हात अधिक नाजूक होतात. आणि महाराज, एक प्रचंड फुलझाड ! रेषारेषांची वंशावळ फुटपट्टी घेऊन कुणीही तयार करील, पण हे म्हणजे औरच. अगदी खाली मध्यभागी एक टुमदार कुंडी काढलेली आहे. तीवर मूळ पुरुषाचं नाव. प्रत्येकाची मुलं ही देवाघरची फुलंच. एकेका फुलावर एकेका मुलाचं नाव. त्या त्या फुलापासून पुन्हा फुलं. त्यांच्यापासून आणखी फुलं. मधेच कुठं तरी फुलांचा हा प्रवाह थांबतो. पण दुसरीकडं तो वाहातच असतो, तिसरीकडेही वाहात असतो. आजूबाजूला हिरवी हिरवी पानं आणि ही जिकडे तिकडे गुलाबी फुलं. उगीच भडकपणा नाही. सौम्यपणा, तोही मधल्या काळाची जाणीव देण्याइतपत फिकट झालेला. असं हे बांधेसूद मनोरम झाड.

आता या घरंदाज चित्राला थोडंसं गालबोट लागलेलं आहेच. आजोबांनी आपल्या मुलापर्यंतचा आराखडा घेऊन तो इथं नीटसपणे रंगवलेला ( किंवा रंगवून घेतलेला ) होता पण त्यानंतरच्या-- अलीकडच्या माणसांचं काय ? तर त्याची भरपाई या माणसांनी साध्या काळ्या पेन्सिलीनं केलेली आहे. या सबंध चित्राच्या संदर्भात त्यांची पेन्सिलीनं रेखाटलेली देठं, पानं आणि फुलं हे सगळंच केविलवाणं, उपरं वाटतं. जागा असेल तिथं वळचणीत कुठंतरी आपलंही घर फुलवण्याच्या आजच्या शहरी वृत्तीचं निदर्शक वाटतं. पूर्वजांच्या रसिकतेचा नूर घालवणारं वाटतं. पण ते चित्र याच माणसांनी जपून ठेवलेलं आहे हेही विसरता येणार नाही. कदाचित पुढची पिढी हे हरवूनही टाकील.

दुसरा विचार असा की, समजा हे हरवलं तरी त्यात खेद मानण्यासारखा भाग कितपत आहे ? ज्या ज्या वेळी रसिकतेनं काही गोष्टी केल्या जातात, त्या त्या वेळी त्यांना अर्थ असतो, त्यात मौज असते. नंतर तो एक लहानशा कुतूहलाचा भाग राहतो. तसं पाहिलं तर हे सगळंचं निरर्थक आहे. कुठलातरी एक मूळ पुरुष कल्पूनच वंशावळ उभी करावी लागते. त्याच्या आधीचं काय ? म्हणजे शेवटी कल्पनेत कुठल्यातरी ॲडम पर्यंत पोचायचं ! तिथं पुन्हा बंदच !"ब्रम्हांड " वगैरे.

माणसाच्या कुतूहलगुणाच्या दृष्टीनं वंशावळ वगैरे सगळं ठीक. पण हीच वंशावळ जेव्हा आपली असमर्थता आपल्याला जाणवून देणारे प्रश्न आपल्या डोक्यात उमटवू लागते तेव्हा आपण तिची लगेच गुंडाळी करतो, हे काय ! हा अर्थात आपला भ्याडपणा !

( १३ ऑक्टोबर,१९६८ )

*****

# निळू फुले

'कथा अकलेच्या कांद्याची' मध्ये मी या माणसाला पहिल्यांदा पाहिलं. पाहिलं आणि ठरवलं हा माणूस ज्यात आहे असं काहीही चुकवायचं नाही. म्हणून मग परवा 'लवंगी मिरची कोल्हापूरची' पाहिलं. ' एक गाव...' वगैरे पाहणं अजून काही जमलेलं नाही. पण म्हणजे एकंदरीत सांगायचा उद्देश असा की मराठी रंगभूमीवर एवढ्या प्रचंड ताकदीनं उभी राहणारी वल्ली दुसरी नाही. हे इतकं भयंकर अफलातून असं हे एवढं एकच पात्र.

लोकनाट्यातला सोंगाड्या किंवा विदूषक हा बहुधा अतिशय गतिमान असतो. एरवीच्या विनोदात शरीर - उच्चार यांचे आणखी दोन कडक वळसे तो मिसळणारच. सारांश, अभिनय म्हणजे इरसाल, उडता, फार्सिकल प्रकार. पण निळू फुले ही असली ' गडबड गोंधळ जरा पहा ' ची धमाल धुमाकूळ अजिबात करत नाही. या माणसाचा शारीरिक अभिनय म्हणजे हिंदीतल्या राजकुमारासारखा अत्यंत माफक, कमीतकमी हालचालींनी प्रचंडात प्रचंड परिणाम साधून जाणारा.

हे या माणसाला का साधत असावं याचा मी बराच विचार केला. पण ते रहस्य पूर्णपणे कळलंय असं बोलायचं धाडस होणार नाही. म्हणजे मोनालिसाच्या स्मितासारखं काहीतरी होतं. अनेक गोष्टी जाणवतात, सुचतात आणि या सगळ्यांची बेरीज म्हणजेसुध्दा पूर्ण फुले नव्हे असं वाटत राहतं. आणि हे वाटणं म्हणजेच या माणसाच्या शक्तीची ओळख पटणं. या माणसाच्या व्यक्तिमत्वातलं हे गूढतेचं अस्तित्व हेच त्याच्या साध्या-सरळ पण गहन अभिनयाचं मूळ.

इतर नट आपले एक पांघरलेलं व्यक्तिमत्व घेऊन एका दिशेनं रोख लावून उभे असतात. सरळसोट स्पष्ट माणसं. पण याचं तस नाही. हा दारुड्या असेल, शिक्षक असेल, बीटनिक असेल, मंत्री असेल किंवा हल्या असेल - तो जे काय असेल ते वठवत असतो सुसंगतपणे -- पण सारखं असं वाटतं की या सगळ्यांपासून हा कुठंतरी दूर आहे. असं वाटतं की निळू फुले नामक एक माणूस मंत्र्याची भूमिका वठवत असून खच्चून भरलेला क्षणाक्षणाला हास्यानं फुलणारा प्रेक्षक समुदाय हे पाहतो आहे -- या सगळ्याचं एक संपूर्ण अवधान या माणसाला असावं. त्यामुळे हा माणूस उघड उघड आपल्यासमोर अभिनय करतोय हेही जाणवत राहतं.( काहीजणांना त्याचा हा मिस्किलपणा आहे असं वाटून रागही येण्याची शक्यता आहे !) आणि तरीहि आपण स्वतःच स्वीकारलेला समोर चाललेल्या गोष्टीच्या खरेपणाचा भ्रम अबाधित राहतो, त्याचा भंग होण्याऐवजी उलट निळूनं निर्माण केलेल्या या अंतरामुळे त्या खरेपणाला जणू एक तिसरं परिमाणच लाभतं.

राम नगरकर हा माणूस एक भाबडा टारगटपणा किंवा टारगट भाबडेपणा करण्यात अस्सल पटाईत. पण त्याच्यात प्रेक्षकांवर एक सरळ सरळ आक्रमण असतं. निळूच्या अभिनयात हा आक्रमणाचा भाग नाही. तो अलिप्त असतो. हा माणूस नेहमी एक खोल गांभीर्य घेऊन उभा आहे हे आपल्याला जाणवत असतं. या माणसाचा आवाज, डोळे, बारीकसारीक हालचाली या सगळ्यांतून ते गांभीर्यवलय जाणवत राहतं. आणि म्हणूनच त्याच्या विनोदावर उथळपणे भडभडून हसणं शक्य होत नाही. आणि हेच या वल्लीतलं खास. आपण हसत असतो आणि आतून कुठंतरी सुटत असतो, साधे होत असतो,गंभीर होत असतो. एक निळं आभाळ फुलत असतं.

( २० ऑक्टोबर १९६८ )

*****

# विश्वदर्शन

लहान पोरं ही खरं म्हणजे थोरच ! नाही म्हणजे कम्माल की काय म्हणतात ना ! ते करण्यात या छोट्या व्यक्ती काही काही वेळेला फार मोठा वकूब दाखवतात असा आपला अनुभव आहे.

नीलेश नामक सुमारे सहा-सात वर्षांचं एक मॉडर्न कार्टं आहे. चट्टेपट्टेरी जर्किन आणि कुठल्यातरी डार्क रंगाची चड्डी हा या महाशयाचा पोषाख. ( म्हणजे आईवडीलही मॉडर्न ! ) आणि मेंदू म्हणाल तर भलताच तेज. तर त्या मेंदूची आणि आमच्या मेंदूची टक्कर खाली देत आहे.

(नीलेश वाचत बसला आहे. तिथेच मी -- म्हणजे काका -- एक आपलं कॉमन संबोधन् )

नीलेशः ( वाचता वाचता थांबून ) काका भारत देश कुठं आहे हो ?

काकाः अं ? भारत ना, अरे, आपण भारत देशातच राहतो.

नीलेशः हॅट् ! आपण पुण्यात राहतो.

काकाः बरोबर आहे.पण पुणं भारतातच आहे. पुणे भारतात आहे,मुंबई भारतात आहे आणि दिल्लीही भारतातच आहे बरं.

नीलेशः हे असं कसं असेल ? तुम्ही म्हणाल की मुंबई पुण्यात आहे । ( खळखळून हसतो. )

काकाः अरे ! बरं थांब हं, तू राहतोस कुठं पुण्यात?

नीलेशः ( लगेच ) सदाशिव पेठ ! ?

काकाः हां ! सदाशिव पेठ पुण्यात आहे की नाही ?

नीलेशः हो नं मग, नाही कोण म्हणतंय !

काकाः आणि डेक्कन जिमखाना सुध्दा पुण्यातच आहे की नाही ?आणि स्वारगेट आणि पुणे स्टेशन ?

नीलेशः हो हो हो !

काकाः तसंच आहे ते. पुणे, मुंबई, दिल्ली भारतात आहेत.

नीलेशः म्हणजे भारत सगळ्यात मोठ्ठा आहे ?

काकाः हो. या आणि अशा खूप गावांचा मिळून भारत होतो.

नीलेशः अरे बाप रे ! -- पण काका भारत तरी सगळ्यात मोठा आहे का, नाही तर --

काकाः अरे भारतासारखे जगात अनेक देश आहेत -- त्या सगळ्या देशांचं मिळून जग होतं.

नीलेशः जग ? हे सुध्दा नावच आहे का हो ?

काकाः नाव ? अं -- म्हणजे हो -- तसं म्हटलं तर नावच आहे ते. आपलं जग हे आपल्या विश्वात आहे आणि आणखी अशी खूप विश्वं आहेत म्हणतात.

नीलेशः बा-प-रे SSS। ( डोळे प्रचंड -- थोड्या वेळानं -- ) काका ही सगळी नावं कुणी ठेवली ?

काकाः नावं...नाही म्हणजे हे तसं सांगता नाही येणार. पडली अशीच सवयीनं .

नीलेशः सवयीनं ?

काकाः हो

नीलेशः म्हणजे ? पण हे इतकं मोठं कशाला काका एवढं ? आपल्याला बघतासुध्दा येणार नाही.

काकाः हो -- पण आहे खरं तसं.

नीलेशः काका समजा आपण असं ठरवलं की हे सगळं बघायचं, तर किती दिवस लागतील ?

काकाः अरे वेडा की काय तू ! सगळं बघता येणंच शक्य नाही. हजारो लाखो वर्षं जरी आपण जिवंत राहिलो तरी शक्य नाही.

नीलेशः काका 'हजारो-लाखो' आणि ' जिवंत ' म्हणजे काय ?

काकाः थांब हं तुला मी खाऊ देतो -- ( चर्चा संपण्याचा अंतीम उपाय.)

या नीलेशला काही दिवसांनी 'हजारो-लाखो' म्हणजे काय ते कळायला लागेल. 'जिवंत' म्हणजे काय ते कळायला लागेल. आणि अशा आणखी कितीतरी गोष्टी कळायला लागतील. काही वर्षांनी तोच मला एखाद्या विषयाविषयी माहिती देऊ शकेल.

व्यक्तीची वाढ ही काय मजेदार गोष्ट असते नाही ?

हे काही संपणार नाही आणि माणसाचा मेंदूही थांबणार नाही.

म्हणजे मग हे सगळं काय ?

असेल ते असो उगीच मेंदू कशाला शिणवा !

*****

(२७ ऑक्टोबर १९६८ )

# गर्दी

गर्दीचं मानसशास्त्र वगैरे गोष्टीबद्दल खूप वेळा बोललं जातं. पण गर्दीतल्या व्यक्तीच्या मनाबद्दल बोलण्याची आता वेळ आलेली आहे. ' प्रॉक्सेमिक्स ' नावाची एक अशा अभ्यासाची नवी शाखाच निर्माण करण्यात आलेली आहे. माणूस आपला भराभर जीवनाचं शहरीकरण करत चाललाय, शहरं वाढवत चाललाय आणि त्याचबरोबर हे नवे प्रश्न निर्माण होताहेत. नव्या विकृती जन्म घेताहेत. शास्त्रज्ञांच्या मते शहरातली गर्दी हे याचं एक प्रमुख कारण आहे.

अमर्याद गर्दीचा परिणाम माणसात शारीर-मानसिक विकृती निर्माण होण्यात होतो. आता हे कसं ? तर डॉ.हॉल यांचं उत्तर --' दडपणांमधून '. ( इतर प्राणी आणि माणूस यांच्यात याबाबतीत फरक नाही हे सिध्द झालेलं आहे.) माणसांना जर असं म्हणजे खच्चून बंदिस्त असं एकत्र ठेवलं तर ती भयंकर हिंस्त्र बनू शकतात. शहरात अशा दडपणांच्या चिन्हांची सुरुवात त्रासिकपणा आणि चिडखोरपणा यांतून होते. उदाहरणार्थ, एखाद्या जबऱ्या वाहतुकीत एखाद्या ड्रायव्हरला थांबावं लागलं तर तो सारखा हॉर्न वाजवत राहतो आणि अतिशय ' सन्माननीय ' शब्दांची बडबड सुरू करतो.

आपल्या सर्व बाजूंनी असंख्य माणसं उभी असणं हे माणसाला असह्य होतं. या असल्या भयानक जवळीकीतून -- अशा दडपणातून त्याच्यात अनेक बिघाड निर्माण होतात. गुन्हेगारी प्रवृत्ती वाढते, हिंसा वाढते, लैंगिक बाबतीत तोल जातो. अंमली पदार्थांचं सेवन, मानसिक आजार आणि नर्व्हस टेन्शनमधून निर्माण होणारे आणखी असंख्य आजार -- ही सगळी याचीच चिन्हं आहेत. एरवी न मिळणारा ऐसपैसपणा ' अंमलाधीन --' अवस्थेतल्या भ्रमिष्ट जगात मिळतो. मग ते घ्या -- असे प्रकार पसरू लागतात.

इथं काही आपल्याला सविस्तरपणा करायचा नाहीय. पण या संदर्भात माणसाच्या अवतीभवतीच्या अवकाशाचे शास्त्रज्ञांनी केलेले विभाग पाहणं मनोरंजक होईल. एका हातावरच्या विभागाला ते ' प्रिय -- जवळीक विभाग ' म्हणतात. प्रेम, स्वास्थ आणि संरक्षण याचा हा विभाग. उदा.जेव्हा लोकलमधे किंवा लिफ्टमधे -- अपरिचित माणसांना या विभागाबाहेर ठेवणं अशक्य होतं तेव्हा दडपण येतं. या विभागापुढचा चार फुटांचा परिसर हा 'वैयक्कित विभाग ', त्याच्यापुढे ' सामाजिक विभाग ' आणि त्यानंतर शेवटी 'गर्दीविभाग '.

तर मंडळी, हे फार गुंतागुंतीचं आहे, नाही ! नाही म्हणजे गर्दी अशी सातासमुद्रापार ठेवता येणं शक्यच नाही. ते म्हणजे आपलं पाण्यात राहून माशाशी वैर ! तर मग आता करायचं काय ? म्हणजे आली का चिंता !

आता चिंता आली हे खरं पण तिचा आपल्याशी काय संबंध ? कमकुवत मनाच्या माणसांनी तिचा विचार करावा. आपल्या मनाचे कसे भले भक्कम थंडगार दगड झालेले आहेत. दडपण वगैरे नाजूक गोष्टींचा न् आपला संबंध काय ? दोनदोनशे मैल रांगांत उभं राहण्याचं दडपण आपल्यावर येत नाही, एखाद्या क्षुद्र कामासाठी कुठल्यातरी कारकुनानं आपला आख्खा दिवस खाल्ला तरी आपल्याला त्याची सवय आहे. मुंबईसारख्या ठिकाणी एखाद्या लोकलमध्ये जिथं केवळ एखादी मुंगीच शिरू शकेल अशा ठिकाणी संपूर्ण दहा माणसं चढली तरी आपण सोयीस्करपणे आणखी छोटे होतो वगैरे वगैरे.

असंख्य प्रकारची असंख्य दडपणं सहजपणे पेलणाऱ्या आम्हा स्थितप्रज्ञ भारतीयांना कोणी असल्या या नाजूक गप्पा सांगू नयेत, आणि हे असले थेर चालवायला आम्हाला वेळही नाही. असो.

( ३ नोव्हेंबर १९६८)

*****

# आवाज

परवा एका अफलातून तरुणाची ओळख झाली. माणूस भलताच गप्पिष्ट होता. खूप हिंडला-फिरलेला, प्रवास केलेला, एकदोन राजकीय संघटनांचा अनुभव घेतलेला. चैनबाजीचे अनेक बारकावे माहीत असलेला आणि गुंडगिरीचेही काही प्रकार खेळलेला. त्यामुळे त्याच्याकडं कुठल्याही विषयावर बोलण्यासारखं खूप होतं आणि तो सतत बोलत होता. अखंड बोलत होता.

संभाषणाच्या ओघात कळलं की, या माणसाला १९५८ पासून झोपच नाही ! त्यावेळी त्याला टायफॉईड वगैरे झाला होता आणि त्यात जी झोप उडाली ती उडाली. याची विश्रांती म्हणजे झोपेच्या गोळ्यांनी येणारी गुंगी ! म्हणजे तसं पाहिलं तर हा एक कायम सताड जागा असा माणूस, मी थक्क झालो.

पण थोड्याच वेळात त्यानं याहून भयंकर गोष्ट सांगितली. काही वर्षांपूर्वी याला एक चमत्कारिक ॲटॅक आला होता. त्यानंतर तो पुन्हा एकदा येऊन गेला. म्हणजे झालं काय की हे लुडबुड लुडबुड खोडकर पोरगं एका दिवशी सकाळी उठलं आणि ' टा रा रा डा रा रा ' वगैरे करत तोंड धुवायला गेलं. पण आवाज कुठाय ? नुसतं आपलं तोंड हलतंय -' टा रा रा-डा रा रा ' पण नो आवाज. त्यानं खाकरून वगैरे पाहिलं, ओरडायचा प्रयत्न केला -- आवाज गुल ! असेल काही तरी म्हणून अंघोळ केली. मग शेवटी आईला खुणेनं सांगितलं. आईला वाटलं की हा आपला नेहमीचा नाटकीपणाच आहे. पण जेव्हा ते खरंच असल्याचं तिच्या लक्षात आलं तेव्हा ती बिचकली. मग अर्थात डॉक्टर वगैरे. अरे हट् तुला काय धाड झालीय बेट्या !-- वगैरे म्हणत डॉक्टरांनी तपासलं. शेवटी एकंदर प्रकार लक्षात येताच ते अगदी म्हणजे चक्रावूनच गेले. मग औषधोपचार. घरात रडारड वगैरे वगैरे वगैरे आणि हे सज्जन कंप्लीट बंद ! घरात भयानक शांतता !

मग पुढं सात-आठ महिन्यांनी काहीही पूर्वकल्पना न देता हा माणूस परत आपला बोलू लागला ! हा मुका का झाला आणि बोलका कसा झाला या दोन्हींचाही उलगडा डॉक्टरांनाही झाला नाही.

त्यानंतर तीनचार वर्षांनी या सगळ्या प्रकाराची एक झक्क उजळणी आणि पूर्वीइतकाच भयानक पुनः प्रत्यय !

त्यामुळं त्याला एक प्रकारची धास्तीच बसलेली आहे. पुन्हा केव्हा आपला आवाज गायब होईल याचा नेम नाही. म्हणून मग एकटा असला तरी दर पाच'-दहा मिनिटांनी तो बोलून पाहतो. काहीतरी गुणगुणून पाहतो.

पहिल्या ॲटॅकनंतर त्याला जी धबधब्यासारखं बोलायची सवय जडली ती कायमची ! 'आवाज आहे तोवर घ्यावं सालं बोलून आणि जिवंत आहे तोवर घ्यावं सालं जगूनही ! ' तो म्हणला.

( १७ नोव्हेंबर १९६८)

*****

# तलफ

पुण्याजवळचं एक खेडेगाव. रात्रीचे दोन वाजलेत. विव्दानांच्या विश्रांतीची गय करून करमणुकीच्या कार्यक्रमांची धमाल बाहेरच्या मैदानात गेलीय. त्याचा माझ्यासारखे काही झोपाळलेले फायदा घेऊ पाहतायत. एवढ्यात माझ्या शेजारचा एकजण उठून बसतो. मेडिकलचा विद्यार्थी, शेवटची टर्म. " ए, चहा पाहिजे बुवा आपल्याला " तो म्हणतो. " आत्ता ?'' मी डोळे किंचितसे उघडत विचारतो. '' हो, मग काय, तलफ इज ए तलफ आफटर ऑल ? चलो. '' इच्छा नसतानाही मी उठून बसतो. आणखी एक दोघं उठतात. '' सर, तुम्ही येता का ? '' झोपेच्या तयारीत असलेल्या एका प्राध्यापकांना तो विचारतो. तेही तयार होतात. पांघरुणांची उपरणी करून आम्ही बाहेर पडतो.

काही अंतरावर मुलामुलींचा एक कंपू गाणीबिणी म्हणत बसलाय... आम्ही रस्त्याला लागतो.

'' अरे पण आता इथं कुठलं हॉटेल उघडं असणार ?'' एकजण चादर घट्ट लपेटत विचारतो.

'' असेल. नसलं तर एस.टी.स्टॅंडवर बघू.'' कुणीतरी उत्तरतं. आम्ही ती दिशा घेतो.

मातीचा उंच-सखल रस्ता, नाला, चिखल, झाडीच्या कडेनं आम्ही वळतो. सगळी बसकी मळकी घरं चिडीचुप. गोठ्यातलं एखादं जनावर पुतळ्यासारखं बसलेलं दिसतं. रस्त्यात मधेच एका सोयीच्या खड्डयात एक कुत्र्याचं मुटकुळं कातडी खूप खाजत असावी पण जणू खाजवायचं नाही अशा निर्धारानंच हे झोपी गेलंय. आणि संथ, शांत, टिपूर चांदणं-- कुडकुडत्या थंडीत अधिकच थंड वाटणार.

मेडिकलचा विद्यार्थी बोलतोय. आम्हा सर्वांशीच पण विशेषतः: आमच्या बरोबर आलेल्या विव्दान प्राध्यापक महाशयांशी. त्याला समाजकार्याची पोटतिडीक असल्यानं फावल्या वेळात तो ते करतो. सध्या त्यानं झोपडपट्टी हे कार्यक्षेत्र घेतलेलं आहे. तिथल्या जीवनाचा तो मानसशास्त्रीय दृष्टीकोणातून अभ्यास करतोय. तिथलं वातावरण, तिथल्या माणसांतले परस्पर संबंध, लैंगिक क्षेत्रातली दादागिरी, अत्यंत विकृत गोष्टींना सवयीनं येणारा नॉर्मलपणा, इत्यादींबद्दल तो बोलतोय. मग तो वेश्यांच्या गल्ल्या, तृतीय पंथीयांच्या वस्त्या यांबद्दल बोलू लागतो. या विषयावर कोणकोणती पुस्तकं आहेत, त्याची चौकशी करू लागतो.

आम्ही एस.टी.स्टॅंडवर येतो. सगळं काही तटस्थ झाल्यासारखं गुडुप. एका कडेकोट बंद हॉटेलाबाहेर 'राईसप्लेट चालू आहे ' अशी ठळक पाटी. सध्या त्या पाटीचा अर्थ गोठून गेलेला आहे.

आम्ही वळतो. दुसऱ्या बाजूला काही दिवे दिसतात. चार पावलं या दिशेला टाकल्यावर ते एक गॅरेज किंवा फॅक्टरी असल्याचं ध्यानात येत. पुन्हा परत माघारी चालू लागतो.

जाताना लक्षात न आलेलं एक ओरबाडल्यासारखं झाड दिसतं. फटफटीत. तो आता, वेश्यांकडे जाऊन रोग घेऊन आलेल्या निरनिराळ्या पेशंटांबद्दल सांगत असतो. तळमळीनं बोलत असतो. आम्ही अतिशय गंभीरपणे चाललेले असतो.

त्या सोयीस्कर खड्डयात मघाचं ते कुत्रं जसंच्या तसं. आम्ही बाजूनं पुढे होतो. थंडी असह्य वाढतेय.

आम्ही मैदानात प्रवेशतो तेव्हा चांदण्याचा स्पष्टपणा अधिक प्रकर्षानं जाणवतो. करमणूक कंपू अजून चालूच आहे. मध्येच मुलामुलींचं उसळतं हास्य.

त्याला आता चहाचा विसर पडलेला दिसतोय. आणि नसला पडला तरी काय उपयोग ?

त्यांच्या चर्चेत व्यत्यय न आणता आम्ही दोघंतिघं सटकतो.!

'' च्यायला आपली तर झोप उडाली .'' एकजण पडता पडता म्हणतो.

'' हं '' -- दुसरा डोळे मिटत म्हणतो. मी काहीच म्हणत नाही.

( २४ नोव्हेंबर १९६८)

*****

# साबण आणि सौंदर्य

बर्ट्रांड रसेलच्या ' लेट द पीपल थिंक ' या पुस्तकात ' पीअर्स ' साबणाची पहिली ओळख झाली. नाही नाही, रसेलनं त्या साबणावर वगैरे लेखबीख लिहिलेला नाही. एका लेखात प्रचारबिचार गोष्टींबाबत बोलताना त्यानं म्हटलं होतं की, तुम्ही नुसतं जागोजागी ' पीअर्स सोप ' एवढेच दोन शब्द असलेल्या पाट्या लावा. बस्स. लोक ते घेणारच. वगैरे.

तर सांगायचा उद्देश असा की, ' युनिलेव्हर ' या पाक्षिकाच्या नोव्हेंबरच्या दुसऱ्या अंकात ( कृष्णपक्षीय अंकात ) मलपृष्ठावर पीअर्स साबणाची एक टॉपशीर जाहिरात आलेली आहे. ठैरो. तुमच्या आमच्या जाहिरातीच्या कल्पना इथं फोल आहेत. आपण काय, धर्मेंद्र म्हणतो मी अमुक साबणच वापरतो किंवा माला सिन्हा म्हणते, मी अमुक सिगरेटच ओढते ( सॉरी, उलटं झालं काय ?) -- असलं काही तरी आठवणार आणि ते ते नाव पुन्हा जाड ठसठशीत म्हणजे साबणाचं किंवा सिगरेटचं !

ठैरो. यातून पुन्हा नाहीतर तुम्हाला वाटायचं की सब्लिमिनल प्रचाराचं ( म्हणजे उदाहरणार्थ सिनेमा चालू असताना एखादी जाहिरात १/१६ सेकंद पडद्यावर येऊन जाणं-- ज्याचा माणसाच्या अर्धजागृत सुप्त मनावर परिणाम होतो आणि ज्याला कायद्यान बंदी आहे, वगैरे. ) माहात्म्य मी सांगतोय की काय तर तस काही नाही. एखादी गोष्ट सरळ सरळ किंवा सरळ किंवा सरळ सरळ सूचक पध्दतीनं सांगूनही चांगला आणि परिणामकारक प्रचार करता येतो.

तर यात ' ए कार्व्हर इन सोप ' ( म्हणजे ' साबणातले कोरीव काम करणारा ' ) हे शुभ्र वळणदार ठसठशीत अक्षरांत आणि खाली मंद मधुर -- शांत--संथ अशी एक सरस्वतीची मूर्ती -- अर्थात् साबणातून तयार केलेली ! संगमरवराइतकाच परिणामकारक पण अधिक कोमल ( विशेष म्हणजे छायाचित्रातूनही हे जाणवतंय ) नक्षीदार मुकुट, एका हातात वीणा आणि डोळे मिटलेला शांत - मग्न चेहरा -- रेखीव.

'' मला खात्री आहे की मी जे काय सांगणार आहे ते तुम्ही अगदी मनापासून ऐकाल.'' ही सुरुवात. असं म्हणून कोणी एक माणूस आला आणि कसल्या कसल्या लहानसहान पिशव्या काढू लागला. च्यायला, हा कुणीतरी विक्रेता दिसतोय असला काही तरी विचार श्री.श्रीनिवासन यांच्या डोक्यात. पण त्या माणसानं जे काय समोर मांडलं त्यानं श्री. श्री. म्हणजे अगदी थक्कच ! ' युध्दाला तयार हो ' असं कृष्णानं अर्जुनाला सांगणं, ही सरस्वती, राधा-कृष्ण वगैरे वगैरे.

आता हे सगळं कशापासून तयार केलं हा प्रश्न आलाच. '' तुमच्याच साबणापासून -- रंगीत लक्स टॉईलेटपासून '' उत्तर आलं. आपल्या कलेच्या माध्यमाच्या उत्पादकांना आपण त्यापासून काय घडवतो ते दाखवावं एवढाच श्री.शेषाद्री यांचा उद्देश होता. तर असा हा एका लहानशा चाकूनं संदर कलाकृतींची निर्मिती करणारा माणूस स्वयंशिक्षित -- स्वयंप्रज्ञ-- आपल्या शिल्पांचं असं वन मॅन प्रदर्शन भरवण्याची महत्त्वाकांक्षा असलेला की ज्यात भारतातल्या देऊळ-स्थापत्यातल्या अनेक पध्दतींचं प्रतिनिधित्व असेल.

आपल्या कलाकृती नाजूकपणे पुन्हा आवरून घेताना श्री शेषाद्री म्हणाले, '' या विक्रीसाठी नाहीत. " पण श्री डेव्हिड ऑर हे मुंबईत असताना श्री शेषाद्रींनी पीअर्स वड्यांपासून तयार केलेल्या दोन कलाकृतींपैकी एक त्यांना अर्पण करण्याचं सौजन्य दाखविलेलं -- हा एक सहज उल्लेख.

खरं तर हा मजकूर म्हणजे इथल्या श्री.शेषाद्रींवरच केंद्रित असायला हवा होता. पण शिल्पाच्या एका चित्रावरून ते जरा कठीणच आणि मुख्य म्हणजे जाहिरातीची अशी संधी एखाद्या उत्पादकाला मिळणं आणि ती त्यानं अत्यंत कौशल्यानं घेणं हे महत्त्वाचंच आहे.

एक मूर्ती आणि तिच्याभोवती जाणवणारा स्वच्छ मोहक दरवळ.

असं मूर्तिमंत सौंदर्य ज्या साबणात सुप्तावस्थेत वास करून आहे तो साबण वापरायचा नाही तर काय.!

बस्स् ! जाहिरातीत न लिहिता हा विचार तुमच्या डोक्यात आलाच पाहिजे.

( १ डिसेंबर १९६८ )

*****

# एकाकी माणसं

' नाटककाराच्या शोधात सहा पात्रे ' हे अलिकडच्या काळात रंगभूमीवर आलेलं एक सणसणीत नाटक. ज्यांनी ज्यांनी पाहिलं ते पोखरले गेले, चक्रावून गेले आणि आपल्याच पायाखालीच जमीन वगैरे गोष्टींबद्दल विचार करायची सद्‌बुध्दी त्यांना झाली.

तर या नाटकात बाप नामक एक पात्र आहे. तो एका ठिकाणी म्हणतो की प्रत्येक माणसाचं आंतर्विश्व हे त्याच्या त्याच्या संस्कारांनी आणि स्वभावधर्मांनी बनत असतं. त्यामुळं गंमत अशी होते की तो बोलता-बोलताना जे शब्द वापरतो त्यांचे अर्थ तो स्वतःच्या आपल्या जगावरून गृहीत धरून चालत असतो. पण ऐकणारा माणूस मात्र त्या शब्दांचे अर्थ आपल्या आपल्या जगाच्या संदर्भात लावत असतो म्हणजे असं की कुणीच-कधीच कुणाला संपूर्णपणे कळू शकत नाही. प्रत्येकजण असा एकाकीच राहतो.

हे सगळं सांगायचं कारण असं की परवा सुरेश भिडेकडं गेलो होतो तेव्हा माणसाच्या एकाकीपणाच्या संदर्भातच तिथं एक गृहस्थ बोलत बसलेले होते. आता तुम्ही म्हणाल की त्यासाठी त्या कुठल्या एका नाटकातल्या पात्राचा हवाला द्यायचं काय कारण ? तर ते बरोबर आहे. पण ते काही हवाला म्हणून सांगितलेलं नाही तर अशा अनेक भेदक गोष्टींचा वेध घेत उभं राहणारं हे नाटक ज्यांनी अजून पाहिलं नसेल त्यांनी संधी मिळाल्यास मुद्दाम पाहून घ्यावं असं जाताजाता मला सुचवायचं आहे. ते असो. तर ते गृहस्थ असं म्हणत होते की माणूस आपण एकाकी आहोत ही वस्तुस्थिती मान्य करायला भितो आणि त्याच्या या भीतीतूनच आक्रमण, संरक्षण,पराभव, विजय वगैरे गोष्टी निर्माण होतात. त्यांचं म्हणणं असं होतं की माणूस दुसऱ्यावर प्रेम करतो किंवा दुसऱ्याचा व्देष करतो या दोन्हींच्या मुळाशी ती एकाकीपणाची भीती असते. त्या भीतीचं स्पष्ट स्वरूप तो कधी समोर येऊच देत नाही आणि म्हणूनच सगळ्यांत अधिक भित्रा माणूस सगळ्यांत अधिक प्रेमळ किंवा सगळ्यांत अधिक दुष्ट असतो.

चर्चेचा विषय तसा साधाच दिसत होता. एकमेकांची उणीदुणी काढण्यात -- एकमेकांच्या वर्मांवर कुत्सित आघात करण्यात आणि एखाद्यावर आपलं वर्चस्व सतत दर्शवीत राहण्यात माणसाला काय एवढं विशेष वाटतं ? त्यातून मग सूक्ष्म डावपेच, त्यांची आखणी वगैरे वगैरे. तर अशा या क्षुद्र गोष्टींत आपलं कंप्लीट मनच्या मन गहाण टाकायला माणूस का तयार होतो असा प्रश्न होता.

विषयाला सुरुवात कुणी केली होती, कोण जाणे, पण सुरेश इतकं सगळं शांतपणे ऐकून घेतोय हे दृश्य मला जरा म्हणजे थोडंसं विशेषच वाटलं. करवतीसारखे प्रश्न विचारणाऱ्या या माणसाला थंड पाहणं हे म्हणजे ग्रेटच होतं.

तर हे गृहस्थ म्हणाले की अशी जी आतून सतत भीती टाळण्याच्या प्रयत्नात असलेली माणसं असतात ना त्यांच्याबद्दल आणखी एक म्हणजे ती एक तर लाचार असतात किंवा उध्दट असतात. नम्र कधीच नसतात. किंवा असं म्हणा की एक तर ती दुसऱ्याचं वर्चस्व स्वीकारतात, आणि त्यात ती आपला एकाकीपणा आपली भीती बुडवून टाकू पाहतात-- किंवा उलट वागण्यात. आणि अशा प्रयत्नांतूनच त्यांना सुरक्षितता वाटते. असं जर केलं नाही तर आपलं अस्तित्वच डळमळलेल असं त्यांना वाटतं.

" काय हो, नम्रपणा आणि लाचारी यांत फरक काय -- नाही म्हणजे तुम्ही कसा सांगाल ?" माझा आपला थोडासा भाबडेपणा.

त्या माणसाचा प्रथम या प्रश्नाकडे दुर्लक्षच करायचा विचार दिसला पण मग तो म्हणाला, " ही सांगायची किंवा विषद करायची गोष्ट नव्हे. ती स्वतः शोधायची-- पाहायची गोष्ट आहे."

मग मी आणखी काही बोलायच्या भानगडीत पडलो नाही कारण प्रत्येकाला कातडी ही असतेच आणि ती बचावणं हा प्रत्येकाचा जन्मसिध्द हक्क आहे ! म्हणजे उदाहरणार्थ माझाही !

( १५ डिसेंबर १९६८)

*****

# क्लिओपात्रा

' अलंकार'  थिएटर. रात्री नवाचा सुमार. थिएटरवर तिकिटांसाठी गर्दी. बाकी रस्त्यावर तशी विशेष रहदारी - गजबजाट नाही. तुरळक.

स्टेशनच्या बाजूनं एक रिक्षा आली. वळताना तिचा वेग जरा कमी झाला आणि एवढ्यात तो क्षण पकडून त्या रिक्षातून एका बाईनं बाहेर झेप घेतली आणि ती ओरडू लागली. जोरजोरात रडू लागली. रिक्षा कचकन थांबली. आतून एक दणदणीत माणूस उतरला. त्या बाईच्या दंडाला धरून तिला रिक्षाच्या दिशेनं ओढू लागला. रिक्षावालाही उतरून पुढे आला. हा प्रकार काय आहे हेच त्याला कळत नव्हतं.

बाई तशी फाटक्या कपड्यांतच होती. कोरडे केस विस्कटलेले होते. चेहरा चिकट-मळलेला होता. रडताना अधिकच विद्रूप दिसत होता. तिच्या कृश अंगकाठीचे हिसके धिप्पाड माणसाला तसूभरही विरोध करू शकत नव्हते. तो माणूस, चल इथं तमाशा करू नकोस वगैरे ( हिंदीतून ) म्हणून तिला खेचत होता पण त्याच्या आवाजात नरमाई होती आणि खरं किंवा खोटं मार्दव होतं.

अर्ध्या मिनिटात लोकांचा ' हा ऽ' जमाव जमला. सगळ्यांनी त्यांना गराडा घातला. एकदोघांनी त्या धिप्पाड माणसाला बाजूला ओढलं. थंडीसाठी गळ्याभोवती टावेल गुंडाळलेला रिक्षावाला आवाजात पुढं आला. '' तू बाजूला हो. तिला हात लावू नकोस '' -- त्यानं त्या माणसाला बजावलं. एकंदर रंग पाहून तो माणूस थोडा बाजूला झाला. '' अहो मी तिचा काका आहे आणि म्हणून मी तिला घेऊन चाललोय-- हे आमचं घरगुती आहे..." वगैरे तो सांगू लागला.

तोपर्यंत ती बाई रडतरडत आगरकर कॉलनीच्या रस्त्यानं निघाली. तर हा माणूस, पळतपळत तिच्यापर्यंत गेला आणि तिला ओढू लागला.

आता रिक्षावाला वैतागला. '' ये कुछ लफडा दिखाई देता है '' -- असं म्हणून त्यानं त्या काकाला खसकन बाजूला ओढलं. '' तू तिला हात लावलास तर आम्ही तुला पिटून काढू '' -- असं तो म्हणाला. जमलेलं पब्लिकही चिडलेलं होतं. रिक्षावाल्याला सगळ्यांचाच पाठिंबा होता.

मग रिक्षावाल्यानं त्या बाईला खरमरीत आवाजात विचारलं, '' बोल, तेरा ये कौन है ?'' ती बाई किंचितशी भ्यालेली दिसली. तिनं आपलं रडणं थांबवलं. डोळे पुसले. पण ती काही बोलेचना. तेव्हा त्या रिक्षावाल्यानं तिला गदगदा हलवलं आणि तो तिला म्हणाला की खरं काय ते सांग, नाहीतर आम्ही तुलाच बदडून काढू. तिनं एकंदर परिस्थितीचा अंदाज घेत असल्यासारखं पाव मिनिट घालवलं -- तो माणूस तिच्याकडे रोखून पाहात शांतपणे बाजूला उभा होता.

'' चाचा '' -- ती म्हणाली. लगेच तो माणूस पुढं आला. चलो भाई, ये हमारे घरका मामला है-- असं म्हणून पुन्हा तो तिला ओढू लागला पण ती पुन्हा ओरडू लागली, रडू लागली. हिसकू लागली. '' मै इनके साथ जाना नही चाहती '' वगैरे म्हणू लागली. पुन्हा लोकांनी त्या माणसाला बाजूला केलं. रिक्षावाला म्हणाला की तुमचं काय लफडं आहे ते खरं सांगा नाहीतर मी तुम्हाला पोलीस चौकीवर नेणार. तो माणूस म्हणाला की चला. चौकीवर नेण्यासाठी तो तिला ओढू लागला. तिनं हिसका दिला. तेव्हा रिक्षेवाल्यानं तू तिचा हात धरू नकोस म्हणून त्या माणसाला दम दिला आणि त्या दोघांनाही एकेका हातानं धरून तो न्यायला लागला. तर त्या बाईनं त्यालाही झटका दिला. तिचा हात धरणारा हा कोण असं तिचं म्हणणं होतं. मग तो म्हणाला ठीक आहे -- निमूटपणे चल तर मग.

आणि मग ते सगळं लटांबर पोलीस चौकीच्या दिशेनं निघून गेलं.

बाहेरच्या अंधारातून आम्ही आतल्या अंधरात गेलो. ' क्लिओपात्रा 'सुरू झालेला होता.

( २९ डिसेंबर १९६८)

*****

# लष्करी क्रांती आणि पिट्टू

झालं काय की खेरा नामक कुणी माणसानं भारताच्या संरक्षण विषयक प्रश्नांची चर्चा करणारं पुस्तक लिहिलं. आता पिट्टू काय हे पुस्तक वाचणार ! फार फार तर त्यानं इतर कोणत्याही वस्तूप्रमाणेच त्या पुस्तकावरही एक पांढरा ठिपका टाकला असता. तर त्याचा आणि या पुस्तकाचा संबंध आला तो वर्तमान पत्रातून. ' भारतात लष्करी क्रांती होणार नाही.'-- हे त्या पुस्तकातलं प्रतिपादन बातमी म्हणून छापण्यात आलेलं होतं. पिट्टू पडला भाबडा. त्याच्या डोक्यात काय आलं कोण जाणे, त्यानं भिर्कन बाहेर एक जंप घेतली.

आला तो उंच एका चाळीतल्या एका छोट्या खिडकीत. आत मोरी होती. सासूबाई आपल्या सुनेच्या मदतीनं आपल्या पिटक्या नातवाला न्हाऊ घालत होत्या. पिट्टूनं खाली एक छोटी जंप घेतली आणि तो कठड्यावर बसला. एक-दोन क्षण. आणि सासूबाईंच्या कानाशी एकदम किंचाळला. " अहो,आपल्या या इंडियात लष्करी क्रांती होणार नाही बरं का !" सासूबाई एकदम वळल्या. "हत् मेल्या !" म्हणून त्यांनी हात झिडकारला. तोपर्यंत पिट्टू केव्हाच आकाशात गेला होता.

मग तो जो तिरका तिरका उतरला तो सरळ एका सलूनमधे शिरला. आत एक तरुण ' बाजूला मशीन नको ' वगैरे न्हाव्याला सांगत होता. पिट्टू दोन-तीन छोट्या छोट्या उड्यांत सनमायका लावलेल्या चकचकीत फळीवर आला. तिथल्या एका वाटीतलं तो हळूच एक थेंबभर पाणी प्याला. ते कोमट पाणी प्याल्यावर त्याला थोडंसं हसूच आलं. पण त्यानं ते आवरलं. मग त्यानं हळूहळू आपला धीर जमा केला. पाय जंप घेण्याच्या तयारीत ठेवले. आणि तो ओरडला, " लोकहो, आपल्या या इंडियात लष्करी क्रांती होत नाहीय बरं का ! " न्हाव्यानं त्याच्या दिशेने काहीतरी फेकायला आणि पिट्टूनं जंप घ्यायला एकच गाठ पडली. न्हाव्याचा नेम बसला पाण्याच्या वाटीवर ! पिट्टू सुखरूप बाहेर !

त्यानंतर तो एका प्रशस्त हॉलमध्ये शिरला. असंख्य चौकोनांचं ते राज्य होतं. प्रत्येक चौकोनात काळे काळे तुकडे. पुढच्या बाजूला एक प्रचंड यंत्र धडाम् धुडूम करत होतं. कागद आत जात होते. तिथं वावरणारी सगळी माणसं ओरबाडल्यासारखी दिसत होती. पिट्टूला खरं म्हणजे थोडी भीतीच वाटली, पण आपल्या मिशनचा विचार करून तो थोडासा धीट झाला. त्यानं हलकेच एका टेबलाच्या कोपऱ्यावर पाय टेकवले. डोळ्यांच्या खाचा झालेला एक चष्मेवाला माणूस समोरच्या कागदावर कसल्यातरी खुणा करत होता. काही क्षण पिट्टू अगदी गरीबासारखा बसून राहिला. आणि मग एकदम घशाचे स्नायू हलवले. "भारतात लष्करी क्रांती होणार नाही !" एका क्षणात तो ओरडला आणि उडाला. नंतर सहज म्हणून त्यानं वळून पाहिलं. '' हे एवढं झाल्याशिवाय माझ्याच्यानं काहीही होणार नाही, मग बघू." तो माणूस मान न उचलता चिरकत होता. पिट्टू नाही म्हटलं तरी थोडासा नर्व्हसच झाला.

तो बाहेर आला तर जगाचे सर्व प्रश्न सुटल्यासारख्या चेहऱ्याचे एक गृहस्थ सरळ रेषेत चाललेले त्याला दिसले. तो माणूस पिट्टूला मग्रूरच वाटला. त्याच्याबरोबर त्याच्या गतीनं उडत उडत पिट्टूनं आपली घोषणा दिली. तर तो माणूस आभाळाकडे पाहात स्मित करत म्हणाला, "शाब्बास, हिंदू धर्म झिंदाबाद ! " पिट्टूनं आकाशात पाहिलं, पण तिकडं कुणीही नव्हतं.

पिट्टू असा खूप फिरला. भेटेल त्याला त्यानं ती सुवार्ता ऐकवली पण त्याला कुठंच रिस्पॉन्स मिळाला नाही. तेव्हा तो भयंकर वैतागला. " या इंडियात कुठल्याही आनंदवार्तेला रिस्पॉन्स मिळणार नाही." त्यानं शेवटची घोषणा केली, आणि एक पांढरा ठिपका थेट जमिनीवर पडला. इंडियाच्या जमिनीवर ।

( ५ जानेवारी १९६९)

*****

# नाटक आणि सत्य

नाटक जन्माला आल्यापासून अस्तित्वात आलेला हा विषय. अलिकडे तर अधिकाधिक गुंतागुंतीचा होत चाललेला असा हा प्रकार. तर अशा प्रायोगिक वगैरे गोष्टी आपण तूर्त बाजूला ठेवू कारण मी या प्रकाराचं जे अगदी प्राथमिक - ढोबळ स्वरूप परवा पाहिलं त्याला गुंतागुंत मान्य नाही आणि मुख्य म्हणजे मला तेच सांगायचंय.

तर इथल्या सांस्कूतिक भवनात झालेल्या संस्कृत नाट्यस्पर्धांबद्दल तुम्ही काहीतरी निदान ऐकलं असेल. नसेल तर आता ऐका.

नाटक -- म्हणजे एकांकिका-- संस्कृत असूनही पब्लिक मोप होतं. सांस्कृतिक भवन अगदी खच्चून पॅक झालेलं होतं. उरलेले आजूबाजूला दारांतून उभे राहून पाहात होते. आता एक बरोबर आहे. एरवी हे इतकं भरलं नसतं. चिटचं नाटकात काम असेल तर बघायला पाखरू इतकंच झालं असतं. पण हा सगळा कार्यक्रम फुकट होता. समद्या पब्लिकला खुल्ला.

तर आम्ही म्हणजे असे की आमचा आपला सर्वत्र संचार. प्रेक्षकांसमोर पडदा पडला की आम्ही पडद्यामागचे नाटक किंवा सत्य पाहायाला जायचो. सुरू झालं की परत बाहेर. त्यामुळं या एकंदरच प्रकारात आमची चिकार म्हणजे चिक्कारच करमणूक झाली.

आता संस्कृत म्हटलं की कौरव-पांडव, इंद्र, अमुकतमुक सगळं आलंच...अशाच एका एकांकिकेची पूर्वतयारी चाललेली होती. कौरवांनी कसला मातीचा हत्ती केला तर भीम म्हणतो की, छट्, आपण थेट इंद्राचा ऐरावत आणणार म्हणून. मग तो डायरेक्ट स्वर्गात जातो आणि ऐरावत घेऊन येतो. तर तो आल्यावर त्याची न् कुंतीची भेट व्हायची होती. त्या भेटीवर स्पॉटलाईट टाकायचं ठरलेलं होतं. तर तो प्रकाशयोजना -- साहाय्यक त्या नाटकाच्या गुरुजींना विचारत होता, " ओ,तुम्ही ती भेट कुठं घेणाराय ? अरण्यात का म्हालात ..?'' त्याचं म्हणणं की माहीत असलं म्हणजे तयारीत ऱ्हायला बरं. तर ते म्हणाले की,'' अरण्यात''.

मग त्या गुरुजींनी भीम आणि कुंती दोघांनाही बोलावलं. '' ए, हे बघ, तू इकडून धावत येणार आणि तू इकडून, अं ? आणि इथं -- या इथं तुमची भेट-- आलं का लक्षात ? ध्यानात राहील ना ? बघा हं ! " ती दोघंही हो-हो करत होती, पण गुरुजींना काही विश्वास वाटेना. त्यांनी खिशातून सरळ एक खडू काढला आणि त्या भेटीच्या ठिकाणी फुली मारली आणि तिथं चक्क 'भेट' असं ठळक लिहून ठेवलं. '' अं ? इथं !'' ते म्हणाले. पोर हुं हुं करत होती. आम्ही म्हणजे मनमुराद खूष !

नंतर प्रत्यक्ष स्टेजवर जेव्हा इकडून भीम आणि तिकडून कुंती असे दुडुदुडु धावत आले आणि त्यांची स्पॉटमधे भेट झाली तेव्हा तर आम्ही अगदी बेहद्दच खूष ! त्यांच्या पायाखाली एक फुली आणि एक भेट आहे हे आम्हाला माहीत !

आणखी अशा बऱ्याच गंमतीजंमती झाल्या. त्यातली एकच सांगतो. बालशिवाजी, बाल मावळे वगैरे लोकांची एक एकांकिका होती. त्यांचा पडदा उघडण्यापूर्वीचा भाग सोडून देऊ. आम्ही बाहेर येऊन सरळ गॅलरीत बसलो. आजूबाजूला सगळी शाळकरी पोरंटोरं. एकमेकांना टपल्या वगैरे वगैरे.

तर त्या एकांकिकेत जेव्हा जिजामाता प्रवेशती झाली तेव्हा एक पोरगं आपल्या दोस्ताला म्हणालं, " आयला ! जिजामाता बघ काय चिकनी दिसतेय !'' तिसरा म्हणाला, "ए साल्या ? माता आहे. तिला काय चिकनी म्हणता ?" "अरे हुड ! नाटकात ती कुणाचं का काम करेना, चिकनी ती चिकनीच !" मधला म्हणाला.

नाटक आणि सत्य यांबद्दलचे असे कांही मूलभूत सिध्दांत आम्हाला या स्पर्धेतून मिळाले.

यात कुठं गुंतागुंत आहे ? सगळा स्वच्छ सरळसोट मामला !

(१२ जानेवारी १९६९)

*****

# घर

मालवाहू मोटार हा काही आपल्यासारख्या बऱ्याच लोकांचा आपुलकीचा विषय नाही. उलट या गोष्टीबाबत भीती आणि कळत न कळत थोडासा व्देष मात्र आपल्या मनांत असतो. खूप ड्रायव्हिंग करायचं असल्यामुळं दारू प्याल्याशिवाय न चालवलं जाणारं वाहन, त्यामुळं अपघात करणारं वाहन आणि अपघात झाला तरी न थांबता पळून जाणारं वाहन असे बरेचसे विचार या वाहनाबद्दल आणि त्याच्या ड्रायव्हरबद्दल आपल्या मनात असतात. परवा एक मालवाहू मोटार पाहिली आणि याहून खूपच वेगळे विचार मनात उमटले. या सगळ्या प्रकाराची एक अंधारातली बाजू समोर आली. तर ट्रक मागची बाजू. काहीतरी लिहून अर्थपूर्ण करण्याची पध्दत आपल्याला माहीत आहेच. ' श्रीराम ', ' फिर मिलेंगे ' पासून ते ' जय जवान नय किसान ' पर्यंत बऱ्याच गोष्टी यात येतात. काही काही वेळी तर सरळ दोन दोन ओळींचे शेरच लिहिलेले असतात. परवा मी पाहिलेल्या मालवाहू मोटारीमागे लिहिलेलं होतं --

खुदा गारद करे
मोटर बनानेवालोंको ।
घर से बेघर किया
मोटर चलानेवालोंको ।।

बस्स. इतकंच. पण या ड्रायव्हर लोकांची व्यथा पुरेपूर ओकणारं. क्षणभर थबकून विचार करायला लावणारं. जीवनाचं साधनच जीवनातला बराचसा रस घालवायला कारणीभूत होण्याचा हा प्रकार ! मोटारीचं चक्र हे यांच्या जीवनाला गती देणारी, जीवन शक्य करणारी शक्तीही आणि त्याच वेळी एक चरकही ! आणि ही असहाय माणसं ! पहिल्यासाठी दुसरं स्वीकारावंच लागलेली !

रात्रंदिवस प्रवास चालू, झोपेच्या वेळी कुठंतरी पेट्रोलपंपाच्या किंवा गॅरेजच्या किंवा जकातनाक्याच्या आसपास गाड्या उभ्या करायच्या. झोप झाली की पुन्हा सुरू. लांबच्या प्रवासाला दोन दोन ड्रायव्हर असतात. आळीपाळीनं गाडी मारायची. ड्रायव्हरच्या डोक्यावर एक छोटीशी फळी, दुसऱ्यानं तीवर झोपायचं ! एकमेकांना विश्रांती देत जोखमीतून पार पडायचं. पुन्हा नवी जोखीम घ्यायची. पुन्हा रस्ता कापायचा. अंतर मोजायचं. गावं मागं टाकायची-- हे असं सतत. हेच आयुष्य.

तसं पाहिलं तर हे विचार थोडेसे हळवेपणाचेच आहेत. या लोकांसारखीच या ना त्या कारणानं बेघर झालेली माणसं या जगात कित्येक असतील.

दळणवळण व्यवसायातले लोक, सैन्यातले लोक, हद्दपार झालेले लोक, पळून आलेले लोक, कशात ना कशात कुटुंबं उद्ध्वस्त झालेले लोक, लपत छपत जगणारे लोक किंवा चिडून, संतापून, कुटुंबाचा त्याग करून भन्नाट झालेले लोक असे किती तरी लोक बेघर आहेत. आम्ही एखादा शेर वाचून व्यक्त केलेल्या सहानुभूतीनं यांचं काय होणार आहे ? शेवटी घरी परतल्यावर आम्हाला पत्नीच्या किंवा आईच्या हातचा चहा मिळतोच आहे.

१९४९ साली 'स्त्री' मासिकात लोककवी मनमोहन यांचे ' घर ' हे एक गद्यकाव्य प्रसिध्द झालेलं होतं. "मनुष्य जन्म घेतो ते घर, मनुष्य बाळपणाने फुलवतो ते घर, मनुष्य अखेरीच्या प्रवासाला निघताना पापण्यांच्या पासोडीत बांधून घेतो ते घर "-- असं खूप त्यात होतं. " घर नसते तर आजची खानेसुमारी टारझन झाली असती "-- असं त्यांनी म्हटलं होतं. घर माणसाला माणसाळावतं. अनेक सूक्ष्म नाजूक धाग्यांनी बांधून त्याला कोमल करत समजूतदार करतं.

हे सगळं ठीक आहे. पण माणसाच्या सुखी आयुष्याची एखादी ठीक कल्पना असावी का ? अस्तित्वात असणं म्हणजे संबंधित असणं, माणसांशी, निसर्गाशी, वस्तूंशी, विचारांशी. मग या संबंधांची स्वरूपं आणि प्रमाणं काहीही असोत. गणवेषासारखे हे संबंध सर्वसामान्य असणं अशक्यच. शेवटी आपण आपापले संबंध पूर्णपणे भरभरून समजुतीनं जगणं हेच स्वच्छ आयुष्य नव्हे काय ?

एरवी कुटुंबवत्सल माणसं तरी काय मोठं आदर्श आयुष्य जगत असतात ? त्यांच्याही डोक्यांत दुसरे कुठले तरी आदर्श असतातच. ट्रकड्रायव्हरांची व्यथा अधिक उघडपणे दिसते इतकंच !

(१९ जानेवारी १९६९)

*****

# नोकरी

चहा घेण्यासाठी म्हणून हॉटेलात शिरलो तर समोरच सुरेश भिडे. त्याच्याबरोबर त्याचा कुणी मित्र होता. सुरेशनं मला 'या, आईये जनाब !' असं म्हणून तिकडं बोलावलं. गेलो. ' हं काय विशेष ?' बसत म्हणालो.' हे अनिल पितांबरे, डिग्रीबिग्री आहे. आता नोकरीच्या शोधात आहेत.' सुरेशनं माझी न् त्याच्या मित्राची ओळख करून दिली.

संभाषणाच्या ओघात कळलं की त्या पितांबरेनं जिथं जिथं शक्यता वाटेल तिथं तिथं अर्ज टाकलेले होते. अनेक बारीकसारीक परीक्षांना तो बसलेला होता. अनेक मुलाखती झालेल्या होत्या. अजून कुठंच काही जमलेलं नव्हतं. जे मिळेल ते स्वीकारायचं असं त्यानं ठरवलेलं होतं.( अर्थात डिग्रीबिग्री विचारांत घेऊन जे मिळेल ते. ) शेवटी तर तो वैतागून म्हणाला की त्याला या सगळ्या प्रकाराचं अगदी खिडकीत बसल्यासारखं फीलिंग आलंय. कुणीही घ्यावं, आणि मोबदला देऊन वापरावं.

या सगळ्यावर सुरेश मंदसं हंसला. हा एक माणसाचा वेगळाच प्रकार. त्यानं आजन्म बेकार राह्यचं ठरवलेलं आहे. मेलो तर मेलो पण नोकरी कधीही करणार नाही हा ठाम निश्चय. त्यामुळं अर्थात लग्नाबिग्नाची निश्चिती नाही. याही प्रकारावर भाळून आलीच कुणी मुलगी तर केलं लग्न, नाहीतर गेलं जग उडत.

''साली मला या जगाची एक गंमतच वाटते," सुरेश सुरू झाला. " स्वतःला अजिबात आस्था नसलेली कामंही माणसांना करावी लागतात आणि ती, ती निमूटपणे करतात. म्हणजे आयुष्याचा फार मोठा आणि महत्त्वाचा भाग हा असल्या कामांना दान. आता हा पितांबरे मिळेल ती नोकरी घेणार म्हणजे च्यायला हे सगळंच बोथट. म्हणजे दुसऱ्याला आणि स्वतःला उपयोगी पडणं हाच आपला या पृथ्वीवर जन्म घेण्याचा उद्देश. तुम्ही जितके अधिक निरुपयोगी तितके जगायला अधिक नालायक. "

"ए माफ कर बाबा.  बेकार असणं हे काय भयानक असतं ते तुला कळलेलं दिसत नाही, एरवी तुझं तत्त्वज्ञान वगैरे ठीक आहे." पितांबरे म्हणाला.

" तुझं सोड. तुला हिणवण्यासाठी मी हे बोलत नाही. एकंदरीतच मला असा प्रश्न पडतो की ही काय साली माणसाची प्रगती, की जिथं कोट्यावधी माणसं नुसती समाजाचा एक उपयोगी भाग म्हणून जगतात ? एरवीसुध्दा एकमेकांच्या एकमेकांना असलेल्या उपयोगावरच सगळ्या संबंधाचे अर्थ अवलंबून."

'' मग कसं जगता आलं पाहिजे ?'' पितांबरेनं विचारलं.

या प्रश्नावर सुरेश क्षणभर गप्प झाला. मग म्हणाला, " नाही , म्हणजे माणूस काहीतरी करणारच हे खरं आहे. पण त्याला जे स्वाभाविक असेल तेच त्याला करता आलं पाहिजे. परिस्थितीच्या सक्तीमुळे अमुक एक करावं लागणं हे भयंकर आहे. आणि सरावानं मग हे सगळं अंगवळणी पडून गेलं तर सगळ्यांत भयंकर.''

"अमुक माणसाला अमुक स्वाभाविक हे कसं ठरणार ?" मी विचारलं.

" ते ज्याचं त्यालाच दिसणार. स्वतः जर माणूस मोकळा असेल -- स्वतःला स्वच्छपणे पाहणारा असेल तर--आपल्याला काय स्वाभाविक हे त्याला निश्चितपणे कळेल."

इथं पितांबरेनं एक दीर्घ सुस्कारा सोडला ."  कशाला उगीच बोअर करतोयस ? स्वाभाविक न फिबाविक ! च्यायला इथं तर काहीच मिळत नाहीय. आपण इथून बाहेर जाताना आपल्याला बिल द्यावं लागणार आहे. नुसती जगाची चिंता कुणाच्या बापानं सांगितलीय ! ''

सुरेश मंदसं हसला." सारांश काय, की तू पराभूत आहेस आणि हा पराभवही तुला पाह्यचा नाहीय. ठीक आहे. ए तू ' साधु और शैतान ' बघितलास का ?'' सुरेशचा हा प्रश्न मला होता.

मग आम्ही ' साधु और शैतान ' वर थोडा वेळ बोलत बसलो.

(२ फेब्रुवारी १९६९)

*****

पत्ता :-- चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा., चिंतामणीनगर,
सावरकर पथ, सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे -- ४११ ००९.
**दूरध्वनी -- ४२२ ७८४७. / २४२२७८४८. / ९३७१००५७७३.**